अखिल भारतीय प्राच्यविद्यासम्मेलन
शतवर्ष महोत्सव ग्रंथमाला – ५५

# प्राचीन भारतीय दायविभाग

## (विज्ञानेश्वर आणि जीमूतवाहन यांच्या मतांचे समीक्षण)

डॉ. सौ. सुलभा रमेश चौधरी

प्रधानसंपादक
आचार्य श्रीनिवास वरखेडी
कुलगुरु

संपादक
आचार्य मधुसूदन पेन्ना
संचालक, संशोधन व प्रकाशन विभाग




कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय
रामटेक, जि. नागपुर (महाराष्ट्र)
२०२०

शीर्षक — **प्राचीन भारतीय दायविभाग**

लेखिका — **डॉ. सौ. सुलभा रमेश चौधरी**

प्रधानसंपादक — **आचार्य श्रीनिवास वरखेडी**
कुलगुरु, क.का.सं.वि., रामटेक

संपादक — **आचार्य मधुसूदन पेन्ना**
संचालक, संशोधन व प्रकाशन विभाग,
क.का.सं.वि., रामटेक

अखिल भारतीय प्राच्यविद्या सम्मेलन — **प्रो. गौतम पटेल,** अध्यक्ष
**प्रो. सरोजा भाटे,** सचिव
**प्रो. ग. उ. थिटे,** उपाध्यक्ष

संपादक मंडळ — **डॉ. दिनकर मराठे,** क.का.सं.वि., रामटेक
**डॉ. वीणा गानु,** नागपुर.

प्रकाशन वर्ष — २०२०

आवृत्ती — **प्रथम**

मूल्य — **रू. २४०/—**

आय.एस.बी.एन. — 978-93-85710-33-9

मुखपृष्ठ — **श्री. उमेश पाटील**

मुद्रक — **अवधूत ग्राफिक्स ॲण्ड प्रिन्टींग, नागपूर**

प्रकाशक — **कुलसचिव, क.का.सं.वि., रामटेक**
**प्रशासकीय भवन, मौदा रोड, रामटेक.**

# PREFACE

It is indeed a matter of great pleasure and pride for Kavikulaguru Kalidas Sanskrit University, Ramtek to have this rarest opportunity of hosting the 50th session of All India Oriental Conference at Nagpur. This **AIOC-50th session at Nagpur** will be forever remembered by all as the year 2019 also happens to be the year of Centenary Celebration of AIOC. The premier objective with which the great scholars of yester years had contemplated and established this national academic event called All India Oriental Conference has been achieved through these years with scores of young scholars contributing significantly to the treasure house of knowledge through their valuable research work.

The research of yore and of the present should be properly recorded so as to make it easily available to all lovers of knowledge and wisdom in the years to come. With this objective, we have contemplated to commemorate the 100th year of this grand event of 50th session of AIOC by way of publishing 100 monographs on different subjects in four languages viz., Sanskrit, Hindi, Marathi and English. It is no doubt a herculean task but still worth of it, for the reason that these 100 monographs will inspire many young scholars to take upon a fresh study and research of the oriental subjects with more vigour and zeal.

The **AIOC Centenary Publication Series** includes wide variety of subjects like Literature, Language, Veda, Indian Philosophy, Sanskrit Grammar, Law, Children Literature, Yoga, Astronomy and Astrology, Ayurveda, Pali, Prakrit, Jain, Buddhism, Education, Library Science, Poetics, Aesthetics, and Indology. It also includes reprint of some rare texts of academic importance which have gone out of print are not easily available. We wish to mark this centenary

celebrations with this series that connects the glory of the past and aspirations of future. I place on record my sincere

gratitude to all the authors of these monographs who have kindly contributed to the richness of this series.

I am confident that the books published in these series will definitely inspire the lovers of Oriental Learning in general and of Sanskrit Language and Literature in particular.

On this occasion, we have published a memorable book of all the speeches of Section-Presidents of all previous sessions of AIOC. It is indeed a very capacious addition to any collection. I with all respect thank two eminent scholars of our times - Prof. Gautam Patel, President and Prof. Saroja Bhate, General Secretary, the torch bearers of AIOC who have not only encouraged us in this venture but also made all efforts to provide these valuable historical speeches for us. I thank all executive members of AIOC and my colleagues of the varsity for making this event a grand success.

My words fall short in describing the painstaking efforts and scholarly commitment of my esteemed colleague Prof. Madhusudan Penna, local secretary of this session in bringing out this series.

I also take this opportunity to profusely thank Shri. Subhash Jain and Shri Dipak Jain, the proprietors of New Bharatiya Book Corporation, New Delhi for their enthusiastic approach and timely work with all precision and grace.

Let us all sanctify ourselves in the eternal flow of wisdom by reading these books and recommending these to others also!

**सरस्वती श्रुतिमहती महीयताम्**

**Ramtek** **Prof. Srinivasa Varakhedi**
10th January 2020 Vice Chancellor, KKSU

# Kavikulaguru Kalidas Sanskrit University
# All India Oriental Conference

**100th Year 50th Session**
**10th-12th January, 2020**

## Chief Patron
Hon'ble Nitin Gadkari
Minister of Road, Transport & Highways of India

## Patron
Prof. Srinivasa Varakhedi
Vice Chancellor, KKSU, Ramtek

## AIOC President
Prof. Gautam Patel
Chairman, Sanskrit Seva Samiti, Ahmedabad.

## AIOC General Secretary
Prof. Saroja Bhate
Professor of Sanskrit (Retd.), Pune University, Pune

## AIOC Local Secretary
Prof. Penna Madhusudan
Dean, KKSU, Ramtek

## Additional Local Secretary
Dr. Harekrishna Agasti
Dr. Kalapini Agasti
Dr. Dinakar Marathe
Dr. Parag Joshi

## Organising Committee
Prof. C.G. Vijayakumar, Registrar (I/c) & Dean, KKSU, Ramtek
Prof. Nanda Puri, Dean, KKSU, Ramtek
Prof. Krishnakumar Pandey, Dean, KKSU, Ramtek
Prof. Laita Chandratre, Dean, KKSU, Ramtek
Dr. Ramachandra Joshi, Finance Officer, KKSU, Ramtek
Dr. Umesh Shivahare, Controller of Examination, KKSU, Ramtek
Dr. Dipak Kapade, Librarian, KKSU, Ramtek
Dr. Renuka Bokare, PRO, KKSU, Ramtek

Shri. Rajivranjan Mishra, Technical Head, KKSU, Ramtek
Shri. Pravin Kalambe, Security Officer, KKSU, Ramtek

## Reception Committee

Prof. Srinivasa Varakhedi, Chairperson Reception Committee & VC, KKSU
Parampujya Govindagiri Swamiji, Rishikesh
Prof. P.T. Chande, Former VC, KKSU
Prof. Uma Vaidya, Former VC, KKSU
Prof. Vijendra Kumar, VC, National Law University, Nagpur
Prof. Rajnish Shukla, VC, National Hindi University, Wardha
Prof. Vinayak Kane, VC, RTM Nagpur University, Nagpur
Shri. Krupal Tumane, Member of Parliament
Shri. Girishji Vyas, Member of Legislative Council
Shri. Chandrashekhar Bawankule, Guardian Minister, Nagpur
Prof. Vishram Jamdar, Director, VNIT, Nagpur
Dr. Bhushankumar Upadhyay, Commissioner of Police, Nagpur
Shri. Vijay Phanshikar, Editor, The Hitavada, Nagpur
Shri. Rajkumar Tirpude, Tirpude Group of Insitutions, Nagpur
Shri. Mohabbat Singh, Tuli International, Nagpur.
Shri. Chandragupta Varnekar, Principal Retd., Nagpur
Shri. Suresh Sharma, Baidyanath, Nagpur
Shri. Prabhakar Rao Mundle, Dharampeth Educational Institutions, Nagpur

## Executive Committee

Prof. G. U. Thite,
Vice President

Dr. Brijeshkumar Shukla,
Treasurer

### Members

Dr. Rajni Satish Chandra Jha
Prof. Shukla Ramakant
Dr. Behera Ranjit
Dr. Meena Shukla
Dr. Nirmala Kulkarni
Dr. Roy Gauri Nath
Dr. Tripathi Uma Rani
Dr. Pushpa Jha
Dr. Basu Ratna
Dr. Mithilesh Kumar
Prof. Singh Prasoon Dutta
Shri. Mishra Arun Ranjan
Dr. Mishra Baidyanath
Dr. Tripathi Rajendra Rasraj
Shri. Harshdev Madhav
Dr. Kamdev Jha
Dr. Parinita Deshpande
Dr. Jha Udayanath (Ashok)

# – अनुक्रम –

# प्रास्ताविक

प्रस्तुत प्रबंधाचा विषय हा 'हिंदु कायद्यातील संपत्तीचे विभाजन' या विषयाशी संबद्ध आहे. हिंदू कायदा हा अतिशय पुरातन असल्याचे मानले जाते. त्याचा उत्पत्तिकाल साधारणत: ४००० बी.सी. पूर्वीचा मानतात. तसा उल्लेख कायदेग्रंथांत आढळतो.[१]

सर्वसाधारणपणे हिंदू कायद्याचे ३ उगम मानले जातात. १) श्रुती २) स्मृती ३) रूढी.

'श्रुती'चा शब्दश: अर्थ 'जे ऐकले आहे' असा होतो. याचा अगदी तंतोतंत अर्थ 'वेद' असा आहे. (श्रुतिस्तु वेदो विज्ञेय:, धर्मशास्त्रं तु वै स्मृति: – मनुस्मृती, २.१०) या श्रुती धर्माचे उगमस्थान होय.

प्राचीन आर्य स्थलांतर करून भारतात आले. त्यावेळी लेखनकला अवगत नव्हती. या आर्यांच्या पूर्वजांनी देवतामुखातून प्रत्यक्षत: ऐकून श्रुती तयार केल्या. त्यातील महत्त्वपूर्ण भागांचे आर्यांनी ठेवलेले जे स्मरण – त्यातून स्मृतींची उत्पत्ती झाली.

या श्रुतींमधील कायदा स्मृतींमध्ये आला आणि त्याला लिखित स्वरूप प्राप्त झाले. या कायदेसंबद्ध साहित्याच्या ३ अवस्था आहेत. या ३ अवस्था आणि कालक्रम या दोन्ही गोष्टी विचारात घेऊन हिंदू कायदा ३ कालखंडात विभागला जाऊ शकतो – १) वेदिक काल, २) धर्मशास्त्रांचा काल (याचे २ उपविभाग आहेत – अ) स्मृतिकाल ब) सूत्रकाल), ३) स्मृत्योत्तर काल.

प्राचीन आर्यांच्या कालाकडे दृष्टिक्षेप टाकला तर त्या काळात ते ईश्वरी चातुर्याच्या कायद्यावर (Law of Divine Wisdom) विसंबून होते. त्यानंतर सांप्रदायिक अथवा रूढिबद्ध कायद्याला महत्त्व प्राप्त झाले, ज्यांचे अस्तित्व श्रुतींमध्ये होते.

**स्मृतिकाल –** स्मृतिकारांना 'ऋषी' असे संबोधिले आहे. हिंदू ऋषी हे ऋषी तर होतेच, पण मूलत:, कायदे बनविणारे होते. त्यांनी हिंदू कायद्याला १८ प्रमुख भागांमध्ये विभागले, न त्यानंतर त्याचे १३२ उपविभाग पाडले.

मनुस्मृती हा हिंदू कायद्याचा सर्वप्रथम आणि सर्वोत्तम ग्रंथ मानला गेला

आहे. वेदांनी सुद्धा मनुला मान्यतेप्रत पोहचविले आहे.[२]

**सूत्रकाल –** वेद हेच धर्माचे उगमस्थान आहे, हे निश्चित. धर्मसूत्र वाङ्मयात धर्मासंबंधीचे कांही नियम, मर्यादा यांचे उल्लेख आढळतात. त्या कल्पनांचा उगम वेदातच आहे, असे दिसते. जसे – 'विवाह' प्रकरणात 'बंधुविहीन कन्येशी विवाह करू नये' असे याज्ञवल्क्य[३] सांगतात. कालपरत्वे नंतरच्या असलेल्या या नियमांचे मूळ वेदांतच सापडते.

मंत्र–ब्राह्मण या साहित्याला 'श्रुती' असे संबोधिले जाते. अन्य वैदिक साहित्य 'स्मृती' या सदरात मोडते. यालाच सूत्रवाङ्मय म्हटलेले आहे. या सूत्रकालात कायद्याचे क्षेत्र प्रगतीपथावर होते. कायद्यासंबंधीचे विधी व रूढी यांच्याशी संबद्ध अनेक सूत्रे लिहिली गेली. यास्कांच्या निरुक्तात कायदेविषयक मर्यादांची मालिका सूत्रपद्धतीने उद्धृत केली आहे.

सूत्रवाङ्मयातील धर्मसूत्रांना तर 'Law-books' असेच म्हटले आहे. गौतम, बौधायन, हारीत, वसिष्ठ यांची धर्मसूत्रे सध्या अस्तित्वात असलेल्या कायद्याच्या दृष्टीने अतिशय महत्त्वाची आहेत. कायदेविषयक ग्रंथांमध्ये गौतमाचे धर्मसूत्र सर्वात प्राचीन आहे, असे नि:संदेहपणे सांगता येते.[४]

**स्मृत्योत्तर काल –** हिंदू कायद्याच्या इतिहासातील हा असा काल आहे की, ज्या कालात हिंदू कायदा आणि न्याय–तत्त्वशास्त्र उत्कर्षाप्रत पोचले होते.

भारताच्या विविध भागांमध्ये धर्मशास्त्रावरील ज्या ग्रंथकारांनी कीर्तीचे अत्युच्च शिखर गाठले होते, त्या त्या भागात त्यांनी केलेल्या कायदेसंबंधी रचनांना वर्चस्व प्राप्त झाले. परिणामत: देशाच्या विभिन्न भागांमध्ये निरनिराळे टीकाग्रंथ कायद्यावरील प्रमुख दिग्दर्शक म्हणून मान्यता पावले. यांतूनच 'मिताक्षरा' व 'दायभाग' हे दोन संप्रदाय अस्तित्वात आले.

भारतामध्ये बंगाल आणि बंगालव्यतिरिक्त इतर भागांमध्ये वारसा हक्का–विषयीचा जो कायदा त्यासाठी जीमूतवाहन यांचा 'दायभाग' आणि विज्ञानेश्वर–कृत 'मिताक्षरा' हे कायदेविषयक ग्रंथ प्रमाण मानले जातात. कायद्याच्या क्षेत्रात अतिशय महत्त्वपूर्ण म्हणून गणल्या जाणाऱ्या आणि हिंदू कायद्यात समाविष्ट झालेल्या या दोन कायदेग्रंथातील **'दायविभाग' या विषयाचा तौलनिक अभ्यास** हा प्रस्तुत प्रबंधाचा विषय आहे.

# संदर्भसूची

1. Hindu law has the most ancient pedigree of the known systems of jurisprudence. Its origin goes back far into the remote past to a period before 4000 B.C. When the Rigveda, the earliest extant composition of the Hindus, is believed generally to have had its beginnings - 'A Treatise on Hindu Law' by S. VenkataRaman, Page 1.

२. 'यद्वै किंञ्च मनुरवदत् तद्भेषजम्' – तैत्तिरीय संहिता, २.२, १०.२
'मनुर्वै यत्किञ्चावदत् तद्भेषजम्' – तांडयब्राह्मण २३.१६–१७

३. अरोगिणीं भ्रातृमतीं असमानार्षगोत्रजाम्। – याज्ञवल्क्य स्मृती १.४३

४. Gautama's work can safely be declared, however, to be the oldest of existing works on Sacred law. - Buhler - 'Sacred books of the east' Vol II - Page 14



# ऋणनिर्देश

हे पुस्तक ‘आचार्य’ पदवीसाठी सादर केलेल्या संशोधनपर प्रबंधावर आधारित आहे.

माझे गुरुवर्य डॉ. भा. र. आष्टीकर यांच्या प्रेरणेने तसेच त्यांच्या अमूल्य आणि सतर्क मार्गदर्शनामुळे – ज्या प्रबंधावर हे पुस्तक आधरित आहे, तो प्रबंध सादर करणे शक्य झाले. स्वत:च्या कार्याचा व्याप सांभाळून त्यांनी वेळावेळी जे मार्गदर्शन केले, त्यासाठी मी त्यांची सदैव ऋणी राहीन.

प्रबंधाच्या पूर्णत्वासाठी ज्या संस्थांची वेळोवेळी मदत झाली, त्यापैकी नागपूर विद्यापीठ ग्रंथालय, नागपूर विद्यापीठ विधी महाविद्यालय, शिवाजी विधी महाविद्यालय, अमरावती – या संस्थांची संदर्भग्रंथ मिळविण्यात फार मोठी मदत झाली. तसेच पुणे येथील डेक्कन कॉलेजच्या ग्रंथालयाने दुर्मिळ ग्रंथ उपलब्ध करून दिल्याने प्रबंध पूर्ण करणे शक्य झाले. या सर्व संस्थांची मी ऋणी आहे.

डॉ. मधुसूदन पेन्ना, अधिष्ठाता, भारतीय दर्शन विभाग, कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय, रामटेक यांनी माझ्या प्रबंधाला पुस्तकाचे स्वरूप देण्यात मौलिक सहकार्य आणि प्रेरणा दिली आहे. त्यांना मी धन्यवाद देते. त्यांची मी ऋणी आहे.

माझ्या प्रबंधाच्या पुस्तकरूपातील हस्तलिखिताला संगणकावर रूपांतरित करण्यात श्री. सतीश ठेंगडी यांचा मोलाचा वाटा आहे. त्यांनी कमी वेळात चांगल्या पद्धतीने मला माझे काम करून दिले. त्यांचीही मी ऋणी आहे.

**– डॉ. सौ. सुलभा रमेश चौधरी**
३७६ ‘अ’, एच्.बी. इस्टेट,
सोनेगांव, नागपूर

# अनुक्रमणिका

## विषय-प्रवेश

प्रबंधाला प्रारंभ करण्यापूर्वी या लिखाणात प्रामुख्याने ज्यांच्या ग्रंथांचा आधार घेतला गेला आहे, अशा स्मृतिकार याज्ञवल्क्य, त्यावरील टीकाकार विज्ञानेश्वर आणि दायभागकार जीमूतवाहन यांच्याविषयी अल्प माहिती देणे उचित ठरेल.

### याज्ञवल्क्य स्मृतीचे कर्ते 'योगीश्वर याज्ञवल्क्य'

योगीश्वर याज्ञवल्क्यांना भारतीय तत्त्वज्ञानाचे 'पितृतीर्थ' मानले आहे. 'अहं ब्रह्मास्मि' या वैदिक महावाक्याचे द्रष्टे, शुक्ल यजुर्वेद आणि शतपथ ब्राह्मणाचे प्रणेते आणि यज्ञसंस्थेचे संशोधक म्हणून याज्ञवल्क्यांना सर्व विद्वज्जन ओळखतात.

ब्रह्मरात आणि सुनंदादेवी हे याज्ञवल्क्यांचे पिता व माता होत. यजुर्वेदाच्या प्रमुख विद्यापीठाचा मान ज्यांच्या आश्रमाला प्राप्त झाला होता अशा वैशंपायनांच्या आश्रमात त्यांनी यजुर्वेदाचे शास्त्रशुद्ध अध्ययन केले. मंत्रसिद्धीचे शिक्षण घेण्यासाठी ते उद्दालक आरुणींजवळ राहिले. ऋग्वेदाचा अभ्यास शाकल्य मुनींजवळ केला आणि योगविद्या प्राप्त करण्यासाठी हिरण्यनाभ यांच्या आश्रमात त्यांनी वास्तव्य केले.

याज्ञवल्क्यांचे गुरू वैशंपायन यांची काही कारणाने अवकृपा होऊन त्यांनी याज्ञवल्क्यांना शिष्य म्हणून दिलेली सर्व विद्या परत मागितली. याज्ञवल्क्यांनी ती आपल्या योगसामर्थ्याने ओकून टाकली. तिलाच पुढे कृष्णयजुर्वेद अशी संज्ञा प्राप्त झाली. पुन: यजुर्विद्या प्राप्त करण्यासाठी त्यांनी अखिल ब्रह्मांडनायक सूर्यनारायणाला गुरू मानले. त्या गुरूने त्यांच्या तपश्चर्येने प्रभावित होऊन त्यांच्या गुरूंजवळ नव्हता असा शुक्ल यजुर्वेद त्यांच्या बुद्धीत बिंबविला. या वेदाच्या प्रसारार्थ आणि उत्कर्षार्थ 'श्रीशुक्ल यजुर्वेदीय वाजसनेय शाखा' अशी संस्था स्थापन करून ते शुक्ल यजुर्वेदाचे शाखाप्रवर्तक आद्य गुरुदेव झाले. खुद्द जनक-राजांनी शुक्ल यजुर्वेदाला राजाश्रयही दिला. याज्ञवल्क्यांनी शुक्ल यजुर्वेदातील

मंत्रांबद्दल सविस्तर माहिती देणारा 'शतपथ' हा महाग्रंथ तयार केला.

अशा रीतीने त्यांनी नवीन वेद रचला, नवीन पंथ स्थापन केला, कार्याची नवीन दिशा आखली आणि नवीन परंपरा रूढ केली.

## विज्ञानेश्वर

याज्ञवल्क्य-स्मृतीवरील टीकाकारांमध्ये विज्ञानेश्वरांना महत्त्वाचे स्थान आहे. विज्ञानेश्वरांनी याज्ञवल्क्य-स्मृतीवर लिहिलेल्या 'मिताक्षरा' नामक टीकेचे महत्त्व सर्व धर्म-साहित्यात अनन्यसाधारण असे आहे.

विज्ञानेश्वरांचा जन्म भारद्वाज गोत्रात झाल्याचा उल्लेख आहे. त्यांनी आपल्या पित्याचे नांव पद्मनाभ भट्टोपाध्याय असे सांगितले आहे. त्यांच्या गुरूंचे नांव उत्तमात्मा असून मिताक्षरेत 'विक्रमादित्य देव' यांचा 'आपला आश्रयदाता' म्हणून उल्लेख आढळतो. १०७६ ते १११४ इ.स. असा त्यांचा काल मानला जातो.

## जीमूतवाहन

बंगालमधील धर्मशास्त्रावरील लेखकांमध्ये जीमूतवाहनांना प्रथम स्थान दिले आहे.

उपलब्ध माहितीवरून जीमूतवाहन परिग्राम नामक खेड्यातील रहिवासी होते. परिग्राम बरद्वान जिल्ह्यात असून अजया नदीच्या दक्षिण किनाऱ्यावर होते. परिग्रामातील भद्रनामक विद्वानाचे ते वंशज होते.

'कालविवेक' ही त्यांची प्रथम रचना होय. त्यानंतर 'व्यवहारमातृका' आणि 'दायभाग' या त्यांच्या रचना होत. जीमूतवाहनांना मिताक्षरेतील कायदा काही बाबतीत पटला नाही म्हणून अथवा काही सामाजिक बाबींचा परिणाम म्हणून त्यांनी मिताक्षरेतील कायदा बराचसा त्याच स्थितीत ठेवून व काही बाबतीत स्वत:ची मते त्यात समाविष्ट करून 'दायभाग' नामक ग्रंथाद्वारे समाजात प्रसृत केलीत. बंगालमध्ये हा जीमूतवाहनांनी सांगितलेला कायदा त्याकाली मान्यता प्राप्त करता झाला. यांच्या कालाबद्दल निश्चित माहिती उपलब्ध नसून ११ ते १६ शतकापर्यंतच्या अवधीत त्यांचा काल सांगितला जातो.

## प्रकरण पहिले

# दाय–निरूपण

हिंदू कायद्याचे उगम आपण पाहिले. परंतु या कायद्याचा उपयोग करण्याची समाजजीवनात गरज कां भासली? स्मृतिकार सांगतात की फार पूर्वी सुवर्णयुगच होते. अर्थात् सर्वच सद्वर्तनी होते. नंतरच्या काळात गैरवर्तन होऊ लागले. आणि समाज सुव्यवस्थित राहण्यासाठी 'राजा' ही कायद्याच्या साह्याने व्यवहार पाहणारी एक अधिकृत व्यक्ती बनली. राजाने बघण्याचा हा जो व्यवहार – त्या व्यवहारासाठी कारणीभूत होणाऱ्या गोष्टींना 'व्यवहार–पद' संबोधिले जाई. पुढे या व्यवहारपदाचे १८ विभाग पाडले जाऊन त्यातील १४ अर्थमूल व ४ हिंसामूल मानले जाऊ लागले. आपल्याला यापुढे ज्या 'दायविभाग' नामक व्यवहारपदाचा विचार करावयाचा आहे, त्याचा अंतर्भाव 'अर्थमूल' या व्यवहारपदात होतो.

'मिताक्षरा' व 'दायभाग' या दोन अधिकारी ग्रंथांमध्ये 'दायविभाग' या व्यवहारपदासंबंधी 'दाय' शब्दाच्या निरूपणाचे बाबतीत कसे वैविध्य अथवा साम्य आढळते, त्याचा आता विचार करू या –

'दायविभाग' मधील 'दाय' हा शब्द वैदिक साहित्यात सुद्धा उपयोगात आणला जाई.[१] यात 'दाय'चा अर्थ हिस्सा (share) असा घेतला जात होता. कायद्यावरील नंतरच्या टीकाकारांनी 'दाय'चा हाच अर्थ कायम ठेवला आहे.

याज्ञवल्क्य–स्मृतीवरील मिताक्षरा टीकेत **विज्ञानेश्वर** 'दाय'ची व्याख्या करतात – ''यद्धनं स्वामिसम्बन्धादेव निमित्तादन्यस्य स्वं भवति तदुच्यते।''[२]

तर **जीमूतवाहन** अशी 'दाय'ची व्याख्या करतात –

''पूर्वस्वामिसम्बन्धाधीनं तत्स्वाम्युपरमे यत्र द्रव्ये स्वत्वं तत्र निरूढो दायशब्द:'' (दायभाग १.५)

वरील **मिताक्षरेच्या** व्याख्येवरून केवळ 'धनाच्या स्वामीशी संबंध असणे' या एकमेव कारणामुळे जे धन दुसऱ्याचे होते, त्याला 'दाय' म्हणावे.

तर **जीमूतवाहना**नुसार ('दायभागा'नुसार) ज्या धनाचे स्वामित्व हे पूर्वस्वामीशी असलेल्या संबंधावरच अवलंबून असते आणि पूर्वस्वामीच्या

नैसर्गिक अथवा इतर प्रकारच्या मृत्युमुळे (वा पतित अथवा संन्यासी होणे या कारणांमुळे) धनावरील स्वामित्व नष्ट झाल्यावरच ज्या धनावर दुसऱ्याचे स्वामित्व निर्माण होते, त्या धनाला 'दाय' म्हणावे.

या दोन व्याख्यांमध्ये स्पष्ट फरक जाणवतो तो असा की जीमूतवाहनाच्या व्याख्येतील 'पूर्वस्वामी' आणि 'तत्स्वाम्युपरमे' या दोन शब्दांद्वारे 'वारसाचे संपत्तीवर स्वामित्व निर्माण होण्यापूर्वी त्या धनाचा स्वामी मृत्युमुळे वा अन्य कारणांमुळे 'पूर्वस्वामी' झाला असणे' हे अत्यावश्यकच आहे.

मिताक्षरा मात्र व्याख्येत 'स्वामी'ला 'पूर्वस्वामी' हे विशेषण लावीत नाही. यावरून हे स्पष्टच आहे की मिताक्षरेनुसार संपत्तीचा स्वामी हा त्याच्या मृत्युमुळे पूर्वस्वामी होण्यापूर्वीही वारसाचा त्या संपत्तीवर अधिकार उत्पन्न होऊ शकतो.

यावरून 'दायभागा'नुसार धनाच्या स्वामीच्या निधनामुळे त्याचे धनावरील स्वामित्व नष्ट झाल्यावरच वारसाला ते धन 'दाय' स्वरूपात मिळते. तर मिताक्षरेनुसार दाय स्वरूपातील धन प्राप्त होण्यासाठी धनाच्या स्वामीशी असलेला संबंधच केवळ पुरेसा आहे.

उपर्युक्त व्याख्यांमध्ये एका मुद्याचे बाबतीत **साम्यही** दिसते. मिताक्षरा व दायभागानेही पूर्वीच्या स्वामीशी संबंध असल्याने जे धन वारसा हक्काने दुसऱ्याला मिळते त्याला 'दाय' असे म्हटले आहे. यावरून मिताक्षरा आणि दायभाग सुद्धा 'दाय' प्राप्त होण्यासाठी धनाच्या पूर्वस्वामीशी वारसाचा संबंध असणे आवश्यक मानतात.

मिताक्षरा आणि दायभाग 'पूर्वस्वामीशी संबंध असल्याने वारसा हक्काने मिळणाऱ्या धनाला 'दाय' म्हणतात' असे सांगतात. यावर भारुची म्हणतात, कन्या आपल्या मातेचे स्त्रीधन केवळ तिच्याशी संबंध असल्यामुळेच घेते. यामुळे अर्थातच स्त्रीधनालाही 'दाय' म्हणावे लागेल.

या मुद्याचे खंडन करताना असे सांगता येईल की, या व्याख्येत स्त्रीधनाचा समावेश केला असता तर स्त्रीधनाची वेगळी व्याख्या देण्याची कांहीच आवश्यकता नव्हती. परंतु मिताक्षरेने व दायभागानेही स्त्रीधनाची वेगळी व्याख्या दिलेली आहे.[३] यावरून दोघेही 'दाया'मध्ये स्त्रीधनाचा समावेश करीत नाहीत, हे स्पष्टच आहे.

# ‘दाय‘चे प्रकार

‘दाय‘ची व्याख्या अभ्यासताना जे धन स्वामीशी संबंध असल्याने वारसाला मिळते त्याला ‘दाय’ म्हणतात, हे आपण पाहिले. या ‘दाय’चे मुख्यत: २ प्रकार आहेत.

१) भागीदारांची संपत्ती (Coparcenary Property)

२) वारसाची स्वत:ची विभक्त संपत्ती (Separate Property)

यापैकी जी भागीदारांची एकत्र संपत्ती ती २ प्रकारात विभागली गेली आहे.

१) पैतृक संपत्ती (Ancestral Property)

२) पैतृक नसलेली भागीदारांची एकत्र संपत्ती

‘पैतृक संपत्ती’ ही पारिभाषिक संज्ञा आहे व त्याद्वारे अशी संपत्ती सुचविली जाते की, जी पिता, पितामह अथवा प्रपितामहाकडून वारसाहक्काने प्राप्त केली आहे. ही पैतृकसंपत्ती विशिष्ट व्यक्तीने वारसाहक्कानेच प्राप्त केलेली असायला पाहिजे. ती भेटीदाखल इ. कारणांनी प्राप्त केलेली असल्यास पैतृकसंपत्ती म्हणविली जाणार नाही

परंतु वारस आपल्या पित्याकडून वारसाहक्काने जी पैतृकसंपत्ती प्राप्त करतो, ती त्या वारसाच्या पित्याची ‘पैतृक’ संपत्तीच असली पाहिजे, असे नाही. ती त्याची स्वत:ची मिळकतही असू शकते किंवा भेटीदाखल मिळालेलीही असू शकते.

सारांश, आपल्या पूर्वीच्या ३ पिढ्यांमधील पिता, पितामह आणि प्रपितामह यांच्याकडून वारसाहक्काने प्राप्त केलेली जी संपत्ती, ती ‘पैतृक’ संपत्ती होय. परंतु या ३ पूर्वजांव्यतिरिक्त इतर संबंधितांकडून वारसाहक्काने प्राप्त झालेली जी संपत्ती, तिला त्या व्यक्तीची स्वत:ची ‘विभक्त’ संपत्ती म्हणतात.

पैतृक संपत्तीचे जे दोन विभाग उल्लेखिले आहेत, त्याना संस्कृत ग्रंथकारांनी ‘अप्रतिबंध दाय’ आणि ‘सप्रतिबंध दाय’ अशा संज्ञा दिल्या आहेत.

यावरील मिताक्षरेचे स्पष्टीकरण असे :–

पिता अथवा पितामहाची संपत्ती पुत्र व पौत्र यांच्याकडे स्वामीशी पुत्रत्व वा

पौत्रत्वाचा संबंध असल्याने वारसाहक्काने जाते. अशावेळी हा ‘अप्रतिबंध दाय’ असतो. कारण पिता व पितामहाची संपत्ती – जी सध्या त्यांच्या मालकीची आहे, तिच्यावर पुत्र व पौत्र यांना (जन्मल्यावर) स्वत:चा हक्क प्रस्थापित करण्यास पिता व पितामहाच्या जीविताचा प्रतिबंध असत नाही. केवळ पुत्र वा पौत्र या नात्याने जन्मल्यामुळेच जन्मत:च ते वारसाहक्क प्राप्त करतात.

परंतु ज्यावेळी स्वत:चा पुत्र निपुत्रिक मरण पावल्याने पिता आपल्या पुत्राची संपत्ती घेतो त्यावेळी तो ‘सप्रतिबंध दाय’ म्हणविला जातो.

जीमूतवाहनांच्या मते ‘दाय’ फक्त एकच प्रकारचा आहे व तो म्हणजे ‘सप्रतिबंध दाय’. संपत्तीवर जन्मत:च स्वत्व उत्पन्न होते याला जीमूतवाहन विरोध करीत असल्याने त्या तत्त्वावर आधारित ‘अप्रतिबंध दाय’ ते मानीत नाहीत.

## ‘दाय’ शब्दाची व्युत्पत्ती

“ददाति दीयते पित्रा पुत्रेभ्य: स्वस्य यद्धनम्, तद्दायम्” अशा प्रकारची ‘दाय’ची व्याख्या, ‘दाय’ची व्युत्पत्ती ‘दा’ धातुपासून झाली आहे, हे सुचविते.

जीमूतवाहन दायभागात सांगतात की, ‘दीयते यत् तद्दायम्’ या व्युतपत्तीवरून ‘दाय’ हा शब्द ‘जे दिलेले आहे’ (म्हणजेच दान) असे सुचवितो.

‘दा’ धातुपासून उत्पन्न झालेल्या ‘दान’ या शब्दाद्वारे एखाद्या विशिष्ट गोष्टीवरील एखाद्या व्यक्तीचा अधिकार नष्ट होऊन दुसऱ्या व्यक्तीचा त्यावर अधिकार उत्पन्न होतो, हे सुचविले जाते. तर ‘दाय’ या शब्दाद्वारे ‘मृत अथवा निवृत्त व्यक्तीचा त्याच्या संपत्तीवरील अधिकार रद्द झाल्यावर दुसऱ्या व्यक्तीचा त्यावर अधिकार उत्पन्न होणे’ ही गोष्ट निर्देशिली जाते. यावरून ‘दा’ धातूपासून उत्पन्न झालेल्या ‘दान’ आणि ‘दाय’ या शब्दांमध्ये ‘पूर्वस्वामिस्वत्वनिवृत्ति – परस्वामिस्वत्वोत्पत्ति’ या फलांचे बाबतीत साम्य आढळते. ‘दा’ धातु ‘दान’ या शब्दाद्वारे जसा एखाद्या गोष्टीचा संकल्पपूर्वक त्याग सुचवितो, तसे ‘दाय’ या शब्दाचे बाबतीत शक्य नसल्याने याठिकाणी मृत्यु होणे अथवा ती व्यक्ती निवृत्त होणे अशासारख्या क्रिया – ज्यामुळे संपत्ती ही दुसऱ्या व्यक्तीच्या स्वाधीन केली जाते – त्या सुचविल्या जातात. ‘दाय’च्या व्युत्पत्तीसंबंधी जीमूतवाहनाचे मत आपण पाहिले. मिताक्षरेत मात्र ‘दाय’च्या व्युत्पत्तीविषयी चर्चा केलेली आढळत

नाही.

अशा रीतीने 'दाय निरूपण' या शीर्षकाखाली 'दाय'ची व्याख्या, त्याचे प्रकार आणि व्युत्पत्ती याविषयीची विज्ञानेश्वर आणि जीमूतवाहन यांची मते पाहिली.

## संदर्भसूची

१. श्रमस्य दायं विभजन्त्येभ्य: । – ऋग्वेद १०.११४.१०

२. याज्ञवल्क्य स्मृती – व्यवहार–अध्यायाची प्रस्तावना

३. पितृमातृपतिभ्रातृदत्तमध्यग्न्युपागतम् ।
आधिवेदनिकाद्यं च स्त्रीधनं परिकीर्तितम् ।। – याज्ञवल्क्य स्मृती २.१४३
अध्यग्नि अध्यावहनिकं भर्तृदाय: तथैव च ।
भ्रातृमातृपितृप्राप्तं षड्विधं स्त्रीधनं स्मृतम् ।। – नारद. दायभाग ४.४

४. दीयते इति व्युत्पत्त्या दायशब्दो ददाति प्रयोगश्च गौण:, मृतप्रव्रजितादि स्वत्व निवृत्तिपूर्वक परस्वत्त्वोत्पत्ति – फलसाम्यात् न तु मृतादीनां तत्र त्याग: अस्ति । – दायभाग १.४



## प्रकरण दुसरे

# स्वत्वविचार

'दाय'च्या व्याख्येत 'स्व' आणि 'स्वामिन्' हे शब्द आलेले आहेत. हे दोन्ही शब्द परस्परसंबंधी आहेत. स्व = संपत्ती (जी एखाद्याच्या मालकीची आहे) आणि स्वामिन् = (संपत्तीचा) मालक, स्वामी.

''किं शास्त्रैकसमधिगम्यं स्वत्वम् उत प्रमाणान्तर समधिगम्यम्?'' या प्रश्नावर मिताक्षरेत सविस्तर विवेचन केले आहे.

मिताक्षरेनुसार, स्वत्व हे शास्त्रैकसमधिगम्य नसून ते लौकिक आहे. कारण ते लौकिक अर्थक्रियेचे साधन असते. व्यवहारात जी देवाण-घेवाण, विक्री, गहाण इ. क्रिया आहेत, त्या केवळ त्याच वस्तूंचे बाबतीत होऊ शकतात, ज्या वस्तूंवर आपले स्वत्व असते. स्वत्वाशिवाय देवाण-घेवाण इ. होऊ शकत नाही.

शिवाय शास्त्रानुसार व्यवहार न करणाऱ्या, शास्त्राचे बाबतीत अनभिज्ञ असणाऱ्या म्लेंच्छादि आणि इतर खालच्या जातीतील लोकांतही स्वत्व-व्यवहार दिसतो.

'स्वत्व लौकिकच आहे' असे मिताक्षरेने सिद्ध केले आहे. मिताक्षरा सांगते की, 'स्वत्व हे लोकप्रसिद्धच आहे. व्यवहारात पुत्रादिकांच्या जन्मामुळेच वडिलार्जित धनावर स्वत्व येते, हेही प्रसिद्धच आहे. याचा निषेध करता येत नाही.[१]

'वारसाला पूर्वजाच्या जीवितकाली सुद्धा त्याच्या संपत्तीवर स्वत्व असते' हा जो मिताक्षरेचा सिद्धान्त तो दायभागाविरुद्ध आहे. कारण दायभागानुसार पूर्वजाच्या मृत्युनंतरच वारसाचे संपत्तीवर स्वत्व निर्माण होऊ शकते.

यावर एक आक्षेप असा की, पूर्वजाचा मृत्यु हे वारसाचे संपत्तीवर स्वत्व निर्माण होण्याचे कारण होऊच शकत नाही. कारण छांदोग्य उपनिषदावरून हे माहितच असायला हवे की, "Existence could spring from existence alone and that existence could not spring from non-existence or negation of existence."[२]

एका उदाहरणावरून आणखी स्पष्ट होईल - 'अ' आणि 'ब' हे दोघे भाऊ

आहेत. त्यांना इतर कोणीही नातेवाईक नाहीत. हे दोघे विभक्त झाले आहेत. ‘अ’ने जमीन खरेदी केली. अर्थातच त्यावर त्याचे स्वामित्व प्रस्थापित झाले. काही कालपर्यंत त्याने त्या जमिनीचा उपभोग घेतला. त्यानंतर त्याचा मृत्यु झाला. अर्थातच त्यानंतर ‘ब’ हा जमिनीचा स्वामी झाला व त्या जमिनीचा उपभोग घेऊ लागला.

यावरील मिताक्षरेचे स्पष्टीकरण असे – या उदाहरणात ‘अ’ आणि ‘ब‘ यांच्यातील संबंध (which was positive something) हा दुसऱ्या अस्तित्वात असलेल्या गोष्टीचे म्हणजेच ‘ब‘चे जमिनीवर स्वामित्व उत्पन्न होण्याचे कारण होऊ शकते. परंतु ‘अ’च्या अस्तित्वाचा नाश हे ‘ब’चे जमिनीवर स्वामित्व निर्माण होणे या positive effect चे कारण कसे होऊ शकेल? कारण ‘अ’च्या जीवितकाली सुद्धा ‘ब’चा स्वामित्वाचा हक्क होताच. (त्यात चैतन्यही जागृत होते) परंतु ‘अ’च्या जीविताच्या प्रतिबंधामुळे तो दडपून टाकल्यासारखा झाला होता. त्या प्रतिबंधाच्या नाशानंतर स्वामित्वाचा हक्क आपले कार्य करू लागला. म्हणूनच ‘अ’चे जीवित नष्ट होणे हे ‘ब’च्या जमिनीवरील स्वामित्वाचे कारण कसे होऊ शकेल?

अशा रीतीने मिताक्षरेनुसार ‘पूर्वजांच्या संपत्तीवर वारसाचे स्वत्व येण्याचे कारण पूर्वजाचा मृत्यु होणे हे नसून पूर्वज आणि वारस यांच्यातील संबंध हेच कारण आहे’ हे सिद्ध करता योईल.

भारूचीनेही[३] ‘अस्तित्वात नसलेली गोष्ट एखाद्या गोष्टीचे कारण होऊ शकत नाही’ असेच सांगितले आहे.

आपल्या दुसऱ्या आक्षेपाद्वारे मिताक्षरा असे म्हणते की, अर्जनक्रिया ही नेहमी प्राप्तकर्त्याची क्रिया असते. तेव्हा जन्म ही जी पुत्राची क्रिया, ती त्याची अर्जनक्रिया कां म्हणविली जाऊ नये? अर्थातच ‘पित्याचा मृत्यु होणे’ या कारणामुळे पुत्र हा पित्याच्या संपत्तीचा अधिकारी होऊ शकत नाही कारण मृत्यु ही पित्याची क्रिया असते. स्पष्टच आहे की, पुत्र हा त्याच्या ‘जन्म’ या क्रियेमुळे पित्याची संपत्ती प्राप्त करतो, पित्याच्या निधनामुळे नव्हे.

या आक्षेपाचे खंडन करताना जीमूतवाहन म्हणतात की, एखादी व्यक्ती केवळ स्वतःच्याच क्रियेद्वारे अर्जन करते, इतरांच्या नव्हे, असा काही सार्वत्रिक

नियम नाही. जसे 'दाना'च्या बाबतीत देणाऱ्याच्या एखाद्या गोष्टीचा त्याग करण्याच्या क्रियेमुळे दान घेणाऱ्याचे त्या वस्तूवर स्वामित्व निर्माण होते. दान घेणारा मात्र सचेतन असायला हवा.

यावर मिताक्षरा आक्षेप घेते की, 'दाना'च्या बाबतीत देणाऱ्याच्या एखाद्या गोष्टीचा त्याग करण्याच्या क्रियेमुळे दान घेणारा 'स्वामी' बनत नाही, तर दान 'स्वीकार' करण्याच्या क्रियेमुळे तो दान दिलेल्या वस्तूचा स्वामी बनतो. कारण 'दानक्रिया' तेव्हाच पूर्णस्वरूप प्राप्त करते, जेव्हा घेणारा ती वस्तू स्वीकारतो.[४]

पुढे 'वारसाला द्रव्यप्राप्ती होण्यासाठी त्याची स्वत:ची अर्जनक्रिया आवश्यक आहे' हे जीमूतवाहन मानतात. परंतु मिताक्षरेप्रमाणे 'पुत्राचा जन्म' ही त्याची अर्जनक्रिया न मानता 'पित्याच्या निधनाचे वेळी पुत्राचे जीवित असणे' हीच पुत्राची अर्जनक्रिया आहे' असे ते ठामपणे सांगतात.

अशा रीतीने स्व, स्वामी आणि स्वत्व या शब्दांचे अर्थ तसेच स्वत्वोत्पत्तीविषयी विज्ञानेश्वर आणि जीमूतवाहन यांच्यात असलेली मतभिन्नता या प्रकरणात आपण पाहिली.

## संदर्भ

१. तथा 'उत्पत्यैवार्थस्वामित्वं लभेत इति आचार्या:' इति गौतमवचनाच्च।
 – याज्ञवल्क्य स्मृती (२.११४) वरील मिताक्षरा टीका

२. ''सदेव सौम्य इदमग्रे आसीदेकमेवाद्वितीयम्। तदेक आहु: असदेवेदमग्रे आसीदेकमेवाद्वितीयम्। तस्मादसत: सज्जायत। कुतस्तु खलु सौम्यैवं स्यात् इति होवाच कथमसत: सज्जायतेति सत्वेव सोम्य इदमग्र आसीदेकमेवा-द्वितीयम्।'' – छांदोग्य उपनिषद् ६.२.१-२

३. 'सप्रतिबन्धे दाये तु प्रतिबन्धाभावो न कारणम्। तुच्छत्वात्।'
 – सरस्वती-विलास पृष्ठ ४०३

४. स्वस्वत्वनिवृत्ति: परस्वत्वापादनं च दानम्। परस्वत्वापादानं च परो यदि स्वीकरोति तदा सम्पद्यते, नान्यथा।
 – याज्ञवल्क्य स्मृती २.२७ वरील मिताक्षरा टीका

## प्रकरण तिसरे

# विभाग-निरूपण

हिंदू कायद्यामध्ये 'विभाग'चा अर्थ केवळ संपत्तीचे विशिष्ट भागांमध्ये विभाजन एवढाच होत नाही, तर मालकी हक्काच्याही विभाजनाचा त्यात अंतर्भाव होतो.

'विभाग'चा धातूनुसार अर्थ पाहिल्यास भज् धातूला 'वि' हा उपसर्ग लावलेला आहे. विभाग आणि भाग हे दोन समानार्थी शब्द आहेत. आणि 'भाग'चा अर्थ अधिक तीव्र करण्यासाठी 'वि' हा उपसर्ग लावलेला आहे. भाग हा शब्द 'भज्' पासून आलेला आहे. ज्याचा मूळ अर्थ आहे 'उपभोग घेणे'. परंतु एखादी गोष्ट उपभोगण्यासाठी प्रथम तिच्यावर मालकी असायला हवी व अशा रीतीने 'भज्'चा 'मालकी प्रस्थापित करणे' असा अर्थ होऊ लागला. जेव्हा एखाद्या वस्तूवर एकापेक्षा जास्त व्यक्तींची मालकी असते, तेव्हा ती वस्तू सर्वांमध्ये विभागून घेण्याची गरज भासू लागते,. ज्यामुळे चांगल्या रीतीने तिचा उपभोग घेणे शक्य होते. त्यामुळे 'भज्'ला 'विभाजन करणे' असा अर्थ प्राप्त झाला.

याज्ञवल्क्य 'विभजेत्' 'विभजेरन्' 'धनभाक्' असा शब्दप्रयोग करताना आढळतात. त्याद्वारे 'विभाग'चे दोन अर्थ प्रतीत होतात.

१) विभाजन (Partition)

२) वारसा हक्क (Inheritance)

१) पिता जीवित असताना पुत्र व पिता यांच्यात संपत्तीचा जो विभाग होतो, अर्थातच या क्रियेद्वारे पुत्रांना दायप्राप्ती होते, तो विभाग.

२) आणि काकाच्या मृत्युनंतर पुतण्या हा त्याच्या काकांची संपत्ती ज्या क्रियेद्वारे प्राप्त करतो, तीही 'विभाग' या शब्दाद्वारे दर्शविली आहे.

अशा प्रकारे २ अर्थांची प्रतीती 'विभाग'द्वारे होते. 'दायविभाग'मध्ये श्री. पावटे सांगतात[१] –

"Inheritance and partition were two aspects of one and

the same essential process denoted by the verb 'भज्'.

संपत्तीचा 'विभाग' ही आर्ष–पुरातन कायद्याची एक विकसित अवस्था होय. अगदी पूर्वी – जेव्हा मानव टोळ्या करून रहात असे, तेव्हा त्या टोळीची संपत्ती सर्वांच्याच मालकीची असे. विभाजनाचे बाबतीत मानव तेव्हा अगदीच अनभिज्ञ होता. परंतु जशी कुटुंबे विकसित होत गेली, विभाजनाची गरज भासू लागली आणि विभाजन हे अपरिहार्य झाले. त्यावेळी 'कुटुंब' ही एक वेगळी संस्था अस्तित्वात आली होती. त्या कुटुंबातील संपत्तीसंबंधीचे नियम ठरविले गेले, वैयक्तिक हक्कासंबंधीचे कायदेविषयक नियम निश्चित झाले आणि स्वार्जित संपत्तीच्या विभाजनाच्या मर्यादा ठरविल्या गेल्या. परंतु सध्या जे संपत्तीचे विभाजन रूढ झाले आहे, ती अवस्था येण्यास मात्र बराच कालावधी लागला.

## 'विभाग'ची व्याख्या

'द्रव्यसमुदायविषयाणां अनेकस्वाम्यानां तदेकदेशेषु व्यवस्थापनम्'[२] अशी मिताक्षरेने 'विभाग'ची व्याख्या केलेली आहे. म्हणजे अनेक प्रकारच्या द्रव्यांचा समुदाय असून त्यावर अनेक व्यक्तींची मालकी असल्यास, त्या सर्वांना त्या द्रव्यातील विशिष्ट हिस्सा देणे यालाच **'मिताक्षरा'** 'विभाग' असे संबोधते.

उदाहरणावरून ही व्याख्या अधिक स्पष्ट होईल. एका व्यक्तीला आई–वडील आणि दोन अविवाहित मुली आहेत. त्या व्यक्तीने स्वकष्टाने कांही संपत्ती मिळविली आणि अर्जनक्रियेमुळे तो त्या संपत्तीचा स्वामी झाला. त्याचबरोबर त्याचे आईवडील व मुलीसुद्धा वारसाहक्कामुळे त्या संपत्तीचे स्वामी झाले (केवळ संपत्तीच्या स्वामीशी संबंध असल्याने) परंतु जोपर्यंत ती व्यक्ती जिवंत आहे, त्या नातलगांचे बाबतीत तो 'सप्रतिबंध दाय' आहे म्हणून त्यावर ते अधिकार गाजवू शकत नाहीत. पुढे स्वामी मरण पावला. अशा वेळी त्या संपत्तीवर ४ व्यक्तींचा अधिकार आहे (अनेकस्वाम्यानां). मातापित्यापेक्षा त्याच्या २ मुली मृताशी जास्त जवळच्या नात्याने संबद्ध आहेत. म्हणून त्या संपत्तीवर २ मुलींची मालकी येईल, मातापित्यांची नव्हे. त्या दोन मुलींना संपत्तीचा एकत्रित उपभोग घेणे आवडणार नाही. म्हणून संपत्तीची पुढील विभागणी करावी लागेल. पहिल्या वेळी मातापित्यांना संपत्तीच्या उपभोगाचे बाबतीत वगळले. पण त्या २ मुलींपैकी

एकीलाही आपण उपभोगाचे बाबतीत वगळू शकत नाही. कारण त्या मृत व्यक्तीशी सारख्याच संबद्ध आहेत. अशावेळी संपत्तीच्या उपभोगाचे बाबतीत 'अंशत: बहिष्कृती' करावी लागेल. मिताक्षरेची व्याख्या सांगते की त्या संपत्तीवर एकापेक्षा अधिक व्यक्तींचा हक्क आहे. (२ मुलींचा) व आपल्याला संपत्तीच्या निश्चित भागावरील त्यांचे स्वाम्य निश्चित करावयाचे आहे. म्हणून ती संपत्ती २ भागात विभागावी लागेल, आणि हाच 'विभाग' आहे.

वरील उदाहरणावरून आपल्याला समजेल की, जवळचे वारस हे दूरच्या वारसांना वारसाहक्क प्रस्थापित करण्यास प्रतिबंध करतात. आणि दोन वारस मृताशी सारखेच संबद्ध असतील तर एक वारस दुसऱ्या वारसाचा संपत्तीवरील अधिकार प्रस्थापित होण्यास अंशत: प्रतिबंध करील आणि हे 'विभाजन' होय, असे मिताक्षरा स्पष्ट करते.

मिताक्षरेच्या तत्त्वाप्रमाणे 'वडिलोपार्जित संपत्तीच्या प्रत्येक भागावर विभागापूर्वीच सर्व दायादांचे स्वामित्व उत्पन्न होत असते, हे जीमूतवाहनांना मान्य नाही. त्यांच्या मते दायादांचे स्वामित्व हे संपत्तीच्या एखाद्या विशिष्ट भागापुरतेच मर्यादित असते. परंतु कोणता विशिष्ट भाग कोणाचा आहे, हे दर्शविणारी निश्चित अशी खूण उपलब्ध नसते. आणि म्हणून विभागाद्वारे प्रत्येक दायादाचा संपत्तीतील विभाग निश्चित केला जातो. यानुसार जीमूतवाहन स्वत: विभागाची अशी व्याख्या करतात.

''एकदेशपात्तस्यैव भूहिरण्यादौ उत्पन्नस्य स्वत्वस्य विनिगमनाप्रमाणाभावेन वैशेषिकव्यवहारानर्हतया अव्यवस्थितस्य गुटिकापातादिना व्यञ्जनं विभाग:। विशेषेण भजनं स्वत्वज्ञापनं वा विभाग:।

यावरून 'विभाग' म्हणजे धनाच्या अथवा जमिनीच्या एका निश्चित अशा अंशावरील एखाद्या विशिष्ट व्यक्तीच्या स्वामित्वाची गुटिकापातादींनी निश्चिती करणे होय. जे स्वामित्व वडिलोपार्जित अशा भूभाग अथवा एखाद्या विशिष्ट भागाच्या संबंधातच उत्पन्न होत असते. परंतु कोणता विशिष्ट विभाग कोणाचा आहे, हे दर्शविणारी निश्चित अशी खूण उपलब्ध नसते. म्हणूनच 'विभागा'द्वारेच प्रत्येक दायादाचा संपत्तीचा हिस्सा निश्चित केला जातो.

विज्ञानेश्वर आणि जीमूतवाहन यांनी केलेल्या व्याख्यांपैकी विज्ञानेश्वरांनी

केलेली ‘विभाग’ची व्याख्या जास्त युक्त वाटते. पूर्वजांकडून आलेल्या संपूर्ण संपत्तीवर सर्व वारसांचे स्वामित्व निर्माण होते आणि विभागाद्वारे प्रत्येक वारसाच्या मालकीचा संपत्तीतील कोणता अंश आहे याची निश्चिती केली जाऊन त्या विशिष्ट अंशाचा उपभोग घेण्याची त्याला मुभा असते, हे प्रतिपादन उचित वाटते.

विज्ञानेश्वरांनी केल्याप्रमाणे सरल अशी व्याख्या करणे शक्य असता ‘वारसाचे संपत्तीच्या विशिष्ट भागावरच स्वामित्व निर्माण होणे आणि मग त्या विशिष्ट अंशाची निश्चिती विभागानंतर होणे अशा अर्थाची जीमूतवाहनांनी केलेली व्याख्या युक्त वाटत नाही.

‘विभाग’ या शब्दाला २ अर्थ आहेत –

1) Division by metes and bounds
2) Separation of severance in interest

मिताक्षरेनुसार उपर्युक्त दोन्ही अर्थात विभागणी होणे शक्य आहे. भागीदारीतील भागीदार हा एखाद्या विशिष्ट वेळी भागीदाराला संपत्तीतील ज्या भागावर हक्क प्राप्त होणार आहे, त्या भागांच्या मर्यादा, सीमा ठरवू शकतो, परंतु मर्यादा घालून प्रत्यक्ष केलेले जे विभाजन ते काही कालपर्यंत लांबणीवरही टाकता येते आणि मधल्या काळात ते भागीदार पूर्वीप्रमाणेच संपत्तीचा एकत्रितपणे उपभोग घेऊ शकतात.

दायभागानुसार बघता, वारसाचे पित्याच्या मृत्युनंतर संपत्तीच्या एखाद्या विशिष्ट भागावरच स्वत्व उत्पन्न होते आणि त्यामुळे या मतानुसार विभाग हा केवळ पहिल्याच अर्थाला अनुसरून होतो. म्हणजेच ‘वारसांना संपत्तीतील त्यांचा विशिष्ट अंश प्रदान करणे’ या अर्थानुसार.

अशा रीतीने ‘विभाग’ची व्याख्या आणि त्याचा अर्थ यासंबंधीचे सविस्तर विवेचन झाले.

## विभाग करण्याचा काल

‘विभागं चेत्पिता कुर्यात् इच्छया विभजेत्सुतान्’[३] या याज्ञवल्क्य वचनावरून ‘पित्याच्या जीवितकाली त्याच्या इच्छेने पुत्रांमध्ये विभाग होणे’ हा एक काल

मिताक्षरा ठरविते.

दुसरा काल म्हणजे 'पित्याच्या मृत्युनंतर पुत्रांमध्ये संपत्तीचे विभाजन होणे.'

आणि तिसरा काल म्हणजे – 'पिता जिवंत आहे परंतु द्रव्याचे बाबतीत नि:स्पृह झालेला आहे, तसेच त्याची संभोगेच्छा निवृत्त होऊन मातेचे रजोदर्शन बंद झालेले आहे.' अशावेळी पित्याची इच्छा नसली तरीही पुत्रांच्या इच्छेनेच संपत्ती विभागली जाऊ शकते.

असे ३ विभागकाल मिताक्षरेने सांगितले आहेत. आणि पुढे शंख–वचनाच्या[४] आधारे असे सांगते की, ''माता गर्भधारणेस समर्थ असताही परंतु पिता मात्र दुर्व्यसनी झाला असता, अधार्मिकतेने वागत असता, अतिशय वृद्ध झाला असता पित्याच्या इच्छेविरुद्ध सुद्धा पुत्र संपत्तीचे विभाजन करू शकतात. अशा रीतीने हाही एक काल मानला असता, मिताक्षरा ४ काल मानते असे म्हणावयास हरकत नाही.

जीमूतवाहन मात्र विभागाचे दोनच काल मानतात.

१) पित्याच्या जीवितकाली, त्याच्या इच्छेने

२) पित्याच्या निधनामुळे त्याचा संपत्तीवरील अधिकार नष्ट झाल्यावर

'ऊर्ध्वं पितुश्चमातुश्च' (मनु ९.१०४) या मनुवचनावरून पिता जीवित असताना पुत्रांचे संपत्तीवर स्वत्व नसते. तसेच जन्मानेच पुत्रांचे संपत्तीवर स्वत्व येत नाही, तर ते पितृनिधनानंतर येते, असा अर्थ जीमूतवाहनांनी स्पष्ट केला आहे.

'अतो जीवतो: पित्रो: धने पुत्राणां स्वाम्यं नास्ति किंतु उपरतयो: इति' यातील 'उपरतयो:' या शब्दाचा अर्थ केवळ 'पित्याच्या निधनानंतर' एवढाच घेऊ नये तर पिता पतित झाला असता, तो निवृत्त झाला असता, संन्यासी होऊन इच्छामुक्त झाला असता असा यातून अर्थ घ्यावा, असे जीमूतवाहन सांगतात.[५]

अशा रीतीने दोनच विभागकाल मानावेत असे सांगून ३ विभागकालांचा जीमूतवाहन निषेध करतात. उपर्युक्त शंखवचनाचाही ते मिताक्षरेप्रमाणे अर्थ घेत नसल्याने आणखी वेगळा काल मानण्याचा प्रश्नच येत नाही.

जीमूतवाहन शंखवचनाच्या आधारे सांगतात की पिता वृद्ध झाला असता, मानसिक दौर्बल्य आले असता अथवा तो दीर्घरोगग्रस्त झाला असता ज्येष्ठ पुत्राने

अथवा त्याच्या संमतीने जो व्यवहारकुशल आहे अशा भावाने पित्याप्रमाणे संपत्तीची व्यवस्था पहावी. कारण माता-पिता जीवित असता पुत्र हे संपत्तीचे बाबतीत स्वतंत्र नसतात.

या विवेचनावरून असे सांगता येईल की, १) पित्याच्या निधनानंतर आणि २) पिता जीवित असता त्यांच्या इच्छेने हे दोन विभागकाल विज्ञानेश्वर आणि जीमूतवाहन दोघेही मानतात. याशिवाय 'पिता नि:स्पृह झाला असता आणि मातेचे रजोदर्शन बंद झाले असता पुत्रांच्या इच्छेने' हा एक विभागकाल - जो मिताक्षरा मानते - तो जीमूतवाहन पूर्णत: अमान्य करतात.

विभागकालाची निश्चिती करताना मिताक्षरेने पुत्रांच्या इच्छेला जास्त प्राधान्य दिलेले आढळते. कारण 'वडिलांची इच्छा होणे' हा विभागकाल सोडला तर उरलेल्या दोन्हीमध्ये पिता कोणत्याही अवस्थेत असता पुत्रांच्या इच्छेने विभागणी करावी आणि एवढेच नव्हे तर पित्याची इच्छा नसतानाही विभाग करावा - केवळ पुत्रांच्या इच्छेसाठीच - असे मिताक्षरा सांगते.

याउलट 'दायभाग' पाहू जाता माता-पिता हे जीवित असताना पुत्र संपत्तीचे बाबतीत स्वतंत्र नसतात हे तत्त्व तंतोतंत पाळल्याचे आढळते. पुत्र हे माता-पित्याच्या जीवितकाली अस्वतंत्रच असल्याने संपत्तीच्या विभागाचीही स्वतंत्रता त्यांना नसणारच व म्हणून दोनपैकी एकाही विभागकालात पुत्रांच्या इच्छेला जीमूतवाहनांनी जमेस धरलेले नाही. तर पित्याची इच्छा नसतांना त्याविरुद्ध विभाग न करण्याविषयी ते आवर्जून सांगतात आणि एवढेच नव्हे तर मिताक्षरेने उद्धृत केलेल्या शंखवचनावरून 'पिता व्यवहार बघण्यास असमर्थ असल्यास पुत्रांना विभागणी करण्याचा अधिकार असतो, असे जे सांगितले आहे, ते केवळ 'कायद्याविषयीच्या अज्ञानामुळेच' असे विधान ते करतात.[६]

विज्ञानेश्वर 'पुत्रांचे जन्मत:च पित्याच्या संपत्तीवर स्वत्व येते, असे मानतात. तर जीमूतवाहन या मताच्या पूर्णपणे विरुद्ध आहे. त्यामुळे त्यांनी सांगितलेल्या विभागकालांमधील भिन्नता स्वाभाविकच वाटते.

जीमूतवाहनांनी पितामह - धनविभाजनाचे २ प्रकार सांगितले आहेत[७]

१) माता-पित्याचे निधन झाले असताना

२) माता गर्भधारणेस असमर्थ झाली असता, पित्याच्या इच्छेने

जीमूतवाहनांच्या मतानुसार पिता जीवित असताना पुत्रांना विभाग मागण्याचा अधिकार नसतो. पिता जीवित असताना पितामह-धनाचा विभाग सुद्धा त्यांच्याच इच्छेने व्हावा असे जीमूतवाहन सांगतात, परंतु 'माता गर्भधारणेस असमर्थ असावी' ही अट पाळलीच पाहिजे असे ते सांगतात. पित्याच्या स्वार्जित धनाचे बाबतीत अथवा पितृनिधनानंतर पित्याच्या वा पितामहाच्या धनविभागाचे बाबतीत मातेसंबंधीची ही अट पाळणे अनिवार्य नाही.[८]

पिता जीवित असतांनाही तो द्रव्याचे बाबतीत नि:स्पृह झालेला आहे, तसेच त्याची संभोगेच्छा निवृत्त होऊन मातेचे रजोदर्शन बंद झाले आहे, अशा वेळी पित्याची इच्छा नसताही पुत्राच्या इच्छेने विभाग होऊ शकतो. असा एक विभागकाल मिताक्षरा सांगते.

१५ शतकांपेक्षा जास्त कालापूर्वीपासून पित्याच्या जीवितकाली पुत्राला विभक्त होण्याचा अधिकार (गौतमापासून मिताक्षरेपर्यंत) मान्यता प्राप्त करता झाला. पित्याच्या जीवितकालीसुद्धा त्याच्या इच्छेविरुद्ध स्वत:चा विभाग मानण्यामध्ये जी 'पुत्राला जन्मत:च पैतृकधनावर असलेल्या अधिकाराची' परिणती झालेली दिसते, त्याला पूर्वीच्या कालात असलेल्या काही धार्मिक भावना कारणीभूत ठरल्या आहेत, असे आपल्याला दिसून येईल. जसे बृहस्पती सांगतात की, अविभक्त कुटुंबामध्ये सर्व भागीदार एकत्रच राहतात आणि त्यांचा स्वयंपाक, देव-ब्राह्मण यांची पूजा हेही एकत्रच होते. परंतु सर्व विभक्त झाल्यास देवब्राह्मणादींची पूजा प्रत्येक घरात वेगळी केली जाईल. त्यामुळे अर्थातच धर्मवृद्धी होईल.[९]

निष्कर्ष असा की, पुत्राच्या इच्छेने विभाग होऊ शकण्याचा जो एक विभागकाल मिताक्षरेने सांगितला आहे, त्याला धार्मिक भावनांची पार्श्वभूमी असावी, असे वाटते.

अशा रीतीने 'विभाग-निरूपण' या प्रकरणात विभाग शब्दाचा अर्थ, व्याख्या, विभागकाल आणि विभक्त होण्यामागील पार्श्वभूमी यांचे सविस्तर विवेचन झाले.

## संदर्भ


१. 'Daya-Vibhaga' - By I. S. Pawate, P. No. 93.

२. 'याज्ञवल्क्य–स्मृती' – व्यवहार अध्याय

३. याज्ञवल्क्य २.११४

४. यथाह शङ्खः अकामे पितरि रिक्थाविभागो वृद्धे विपरीतचेतसि रोगिणि च''
– याज्ञवल्क्य स्मृतीवरील (२.११४) मिताक्षरा टीका

५. न च उपरममात्रमेव विवक्षितं किन्तु पतित–प्रव्रजिताद्युपलक्षयति स्वत्व–विनाशहेतु–साम्यात्। – दायभाग १.३१

६. 'पितर्यशक्ते व्यवहाराञ्जेष्ठः प्रतिकुर्यादनन्तरो वा कार्यः तदनुमतो न त्वकामे पितरि रिक्थविभागो वृद्धे विपरीतचेतासि दीर्घरोगिणि वा ज्येष्ठ एव हि पितृवदर्थान् पालयेत् इतरेषां रिक्थमूलं हि कुटुम्बस्वतन्त्राः पितृमन्तो मातुरप्येवं अवस्थितायाः' – दायभाग १.४२ quoted as शंखलिखितौ and adds – अतो न त्वकामे पितरि इत्येतदेव कार्यक्षमे पितरि रिक्थविभाग इति भ्रान्तलिखितम्।

७. पितामहादिधनस्यापि पित्रोरभाव इत्येको विभागकालः।
तथा मातुर्निवृत्ते रजसि पितुरिच्छात इत्यपरः।
– जीमूतवाहन : दायभाग २.७

८. पितामहधनस्यापि पितुरिच्छयैव विभागः कार्यः किन्तु मातुर्निवृत्ते रजसीति विशेषः स्वोपात्ते तु रजोनिवृत्तिमन्तरेण अपि पितुरूर्ध्वं तु उभयत्राप्य–विशिष्टम्। – जीमूतवाहन : दायभाग २.३३

९. एकपाकेन वसतां पितृदेवद्विजार्चनम्।
एकं भवेद्विभक्तानां तदेवस्याद् गृहे गृहे।। – बृहस्पती




## प्रकरण चौथे

# विभाग करण्याचे अधिकारी आणि विभाग करण्याच्या पद्धती

संपत्तीचे जे प्रकार – स्वार्जित, पैतृक इ. त्यानुसार विभाग करण्याचे अधिकारी आणि विभागाची पद्धत ही भिन्न असते. जसे – स्वार्जित संपत्तीवर केवळ अर्जयित्याचाच अधिकार असल्याने त्याचे स्वेच्छया विभाजन करण्याचा अधिकारी केवळ अर्जयिताच असतो. परंतु पैतृकधनाचे बाबतीत मात्र इच्छेनुसार विभाग करण्याची संमती कोणीही दिलेली आढळत नाही.

पिता जीवित असून निर्दोष असताना (अतिवृद्धत्वाचा दोष त्यात नसताना) पिता हाच संपत्तीचा विभागकर्ता असतो. त्याने हा विभाग कशा रीतीने करावा, याचा नियम मिताक्षरा सांगते[१] – ''पित्याला जेव्हा विभाग करण्याची इच्छा होईल तेव्हा त्याने स्वत:च्या इच्छेनुसार संपत्तीचे विभाजन करावे''. परंतु इच्छा ही निरंकुश असते. म्हणून या विभाजनाविषयी नियम सांगितला आहे की, एकतर ज्येष्ठ पुत्राला श्रेष्ठ भाग, मध्यमाला मध्यम आणि कनिष्ठाला कनिष्ठ भाग द्यावा, अथवा सर्वांना समभागच द्यावा.

उपर्युक्त याज्ञवल्क्यवचनाचे बाबतीत मिताक्षरेने काळजीपूर्वक उल्लेख केलेला आहे. तो असा की – 'ज्येष्ठं वा श्रेष्ठभागेन' हा जो विषम–विभाग सांगितला आहे, तो केवळ स्वार्जित धनाचे बाबतीतच असून पैतृकधनाचा मात्र समविभागच व्हायला हवा.[२]

जीमूतवाहनांनीही ''विभागं चेत्...'' या याज्ञवल्क्य वचनाचा पूर्वार्ध हा स्वार्जित धनासंबंधी असून उत्तरार्ध हा पैतृकधनाविषयी समजावा'' असेच स्पष्टीकरण दिले आहे.[३]

'विभागं चेत्पिता कुर्यात्...' याद्वारे 'ज्येष्ठं वा श्रेष्ठभागेन...' हा जो विषमविभाग सांगितला आहे, त्यालाच 'उद्धारविभाग' (ज्येष्ठाला मिळणारा विशेष भाग) असे म्हणतात. उद्धारविभागाची प्रथा मनुच्या कालापासून चालत आली आहे.

'मनुः पुत्रेभ्यः दायं व्यभजदित्यविशेषेण श्रूयते। अथापि तस्माज्ज्येष्ठं पुत्रं धनेन निरवसाययन्तीति एकवच्छ्रूयते। (तै. सं. ३.१.९.४, २.५.२.७)

तैत्तिरीय संहितेतील या उद्धरणांवरून मनुने आपल्या पुत्रांमध्ये विषम विभाग केल्याचा आणि ज्येष्ठ पुत्राला मिळणाऱ्या श्रेष्ठ भागाचाही उल्लेख आढळतो.आपस्तंबाने विषमविभागाविषयीची वचने आपल्या धर्मसूत्रात अंतर्भूत केली असली तरी तो स्वत: मात्र समविभाजनालाच मान्यता देणारा होता. वेदिक कालात सुद्धा 'सर्व पुत्रांना संपत्तीत समविभाग द्यावा' असा नियम मानला जात असून ज्येष्ठाला श्रेष्ठ विभाग हा अपवाद समजला जाई.

मिताक्षराही विषम विभागणीस प्रतिकूल आणि सम-विभागणीस अनुकूल अशी उद्धरणे देऊन हेच सांगते की, विषम विभागणीचा उल्लेख जरी शास्त्रात असला तरीही तो लोकरीती आणि श्रुती याविरुद्ध असल्याने तसा विभाग न करता समविभाजनच करावे. 'विभजेरन्सुता: पित्रो: ऊर्ध्वमृणं समम्' (याज्ञवल्क्य २.११७) क्या याज्ञवल्क्यवचनात हेच सांगितले आहे.

जीमूतवाहन विषमविभाग धर्म्य ठरविणारी याज्ञवल्क्य[४] आणि नारद[५] यांची वचने उद्धृत करतात. यावरून जीमूतवाहनांनी या कारणांसाठी विषमविभाग अधिकृत ठरवला आहे - १) गुणवत्वेन सन्मानार्थम्, २) बहुकुटुंबत्वेन वा भरणार्थम्, ३) अयोग्यत्वेन वा कृपया, ४) भक्तत्वेन वा प्रसन्नतया. परंतु केवळ स्वार्जित धनाचे बाबतीतच. इतर धनांचे बाबतीत नव्हे. अर्थातच कारणाशिवाय केलेला विषमविभाग न्याय्य नसतो, हे उघड आहे.

जीमूतवाहनांनी उद्धारविभाग आणि विषमविभाग हे दोन्ही वेगवेगळे मानले आहेत. दायभागात हे मनुवचन ते उद्धृत करतात[६]

भ्रातॄणामविभक्तानां यद्युत्थानं भवेत् सह।

न तत्र भागं **विषमं**, पिता दद्यात् कथञ्चन।।

यात मनुने विषमविभागाचा निषेध केला असला तरी उद्धारविभाग केला जाऊ शकतो असे तो स्पष्ट सांगतो -

'उद्धारस्तु तदा पित्रा दातव्य: एव तस्य विषमविभागरूपत्वाभावात् न्यूनाधिक विभागस्यैव निषेधात्'

यावरून जीमूतवाहन 'ज्येष्ठाला श्रेष्ठभाग मिळणे' याला उद्धारविभाग

मानतात आणि पुत्रापैकी एखाद्यालाच विशेष भाग मिळावा अथवा एखाद्याला अजिबातच मिळू नये याला विषमविभाग मानतात.

मिताक्षरा मात्र उद्धारविभाग आणि विषमविभाग हे २ भिन्न प्रकार मानीत नाही. 'ज्येष्ठं वा श्रेष्ठभागेन' असा उद्धारविभागाचा प्रकार सांगून त्याविषयी मिताक्षरा विशेष सांगते – 'अयं च विषमो विभाग स्वार्जितद्रव्यविषय:' म्हणजेच उद्धारविभागाविषयीचा विशेष सांगतानाच 'विषमविभाग' असा शब्दप्रयोग मिताक्षरा करते. यावरून उद्धार आणि विषमविभाग यात मिताक्षरा भिन्नत्व मानीत नाही.

पित्याच्या स्वार्जित धनाविषयी मिताक्षरा व जीमूतवाहन दोघांचीही मते सारखीच आहेत.

पितामहाच्या धनाविषयी – पैतृकधनाविषयी – मात्र दोघांचीही मते भिन्न असलेली दिसतात –

मिताक्षरेने 'अप्रतिबंधदाय' मानलेला आहे. त्यामुळे पितामहाच्या धनावर पौत्राचे जन्मानेच स्वत्व येते. अर्थातच पिता–पुत्रांचे पितामहाच्या धनावर सारखेच स्वत्व असते, असे मिताक्षरा मानते. या समानाधिकाराविषयी याज्ञवल्क्य सांगतात –

भूर्या पितामहोपात्ता निबन्धो द्रव्यमेव वा
तत्र स्यात्सदृशं स्वाम्यं पितु: पुत्रस्य चोभयो: ।[७]

याचे स्पष्टीकरण मिताक्षरा देते की, 'पितामहाने मिळविलेले शेत, भूमी, निबन्ध (निबन्धो वाणिज्याधिकारिभि: प्रतिवर्षं प्रतिमासं वा किंचिद्धनमस्मै ब्राह्मणाय देवतायै वा देयम्) सुवर्णरजत इ. प्रतिग्रह विजयादिद्वारा मिळविलेले जे धन त्यावर पिता व पुत्र यांचे सारखेच स्वाम्य असते. म्हणून त्याचा समविभाग करावा. अशा धनाचा पित्याच्या इच्छेनुसार विभाग होणार नाही किंवा पिता त्यातील भागद्वयाचाही अधिकारी नसतो.

'पितृतो भागकल्पना'[८] या याज्ञवल्क्यवचनानुसार अशी वाचनिकी व्यवस्था ठरते की, पिता–पुत्रांचे पितामहाच्या संपत्तीवर जरी **समान स्वत्व असले तरी** विभाजन करताना मात्र पौत्रांना पित्याद्वारेच धनाचा भाग मिळतो. प्रो. काण्यांनी ही कल्पना उदाहरणाद्वारे स्पष्ट केली आहे[९] ।

सारांश, पितामहाच्या धनाचे बाबतीत पौत्राच्या नावाने विभाग पाडले जात नाहीत, तर पुत्रांद्वारे (अर्थातच पौत्रांच्या पित्याद्वारे) त्या पौत्रांना पितामहाच्या धनातील अंश मिळतात. मिताक्षरा स्पष्ट सांगते की, पुत्र निधन पावले तरीही पौत्रांना पुत्रांच्या विभागानुसार पितामहाच्या धनातील अंश मिळतो. 'ही वाचनिकी व्यवस्था आहे' अर्थातच विशेष परिस्थितीतच ही लागू पडते. एरवी जन्मत: स्वत्व निर्माण होण्याचा मूळ नियम लागू केला जातो आणि पिता जीवित असताना सुद्धा त्याच्या इच्छेविरुद्ध पुत्र विभाग मागू शकतात. याद्वारे 'दायभाग'कार जीमूतवाहनांचे जे मत की, 'पितामहाच्या धनावर सुद्धा पुत्राचे जन्माने स्वत्व येत नाही तर पूर्वस्वामीच्या निधनानेच येते या मताचे खंडन मिताक्षरेने केले आहे, कारण पितामहाच्या निधनाने त्यांच्या धनावर पौत्रांचे स्वत्व येते, असे मानले तर पितामहाच्या मृत्युसमयी पौत्राचा जन्म झालेला नसल्यास त्याचे पितामहाच्या धनावर स्वत्वच उत्पन्न होणार नाही.

'भूर्या पितामहोपात्ता' यासारख्या वचनांवरून 'पितामहाच्या धनावर पितापुत्रांचे सारखेच स्वाम्य असते' असा निष्कर्ष मिताक्षरा काढते. परंतु हा निष्कर्ष जीमूतवाहनांना मान्य नाही. धारेश्वरचे वचन[१०] उद्धृत करून जीमूतवाहन स्पष्ट करतात की, 'स्वत:च्या इच्छेने पिता संपत्तीचा विभाग करीत असता, पितामहाच्या धनाचे तो स्वार्जित धनाप्रमाणे स्वेच्छेने न्यूनाधिक करू शकत नाही. कारण त्यावर त्याच्याबरोबरच त्याच्या पुत्रांचेही सारखेच स्वाम्य असते.'

पितामहाच्या धनावर सदृश स्वाम्य असते म्हणजे पितापुत्रांना अगदी समान विभाग मिळावेत असा (जीमूतवाहनांनी समजल्याप्रमाणे) मिताक्षरा अर्थ गृहीत धरत नाही तर त्या पितामहद्रव्यावर पितापुत्रांचे सदृश स्वाम्य असल्याने म्हणजेच सारखाच अधिकार असल्याने त्या धनाचा पित्याच्या इच्छेनुसार विभाग होऊ शकत नाही आणि स्वार्जित धनावर पितापुत्रांचा सम अधिकार नसल्याने पित्याच्या इच्छेनुसार विभाग होऊ शकतो आणि त्यातील भागद्वयही पिता घेऊ शकतो अशा प्रकारे मिताक्षरेची बाजू स्पष्ट झाली आहे.

**पितामहाच्या धनाचे बाबतीत मिताक्षरा व जीमूतवाहन यांच्या मतातील भिन्नता सांगताना हे नमूद करता येईल की,**

१) पुत्राला जन्मत:च त्या धनावर अधिकार प्राप्त होतो असे मिताक्षरा मानते तर

जीमूतवाहनांच्या मते पित्याचे निधन झाल्याशिवाय त्यावर (दुसऱ्या) पुत्रांचा हक्क स्थापित होऊच शकत नाही.

२) या धनात पुत्र केव्हाही विभाग मागू शकतात आणि अविभक्त असताना पिता त्या धनासंबंधी दानविक्रयादि व्यवहार करीत असता त्याचा निषेध करण्याचा अधिकारही त्यांना असतो, असे मिताक्षरा सांगते तर 'पिता जीवित असेपर्यंत त्या धनासंबंधीचे सर्वाधिकार पित्यालाच असतात. पुत्रांना त्याविषयी काहीही अधिकार नसतात, असे जीमूतवाहन सांगतात.

३) जीमूतवाहनांचा 'दायभाग' पाहू जाता पितामहधनात पितापुत्रांचे समान स्वाम्य सांगणारी वचने जीमूतवाहनांनी उद्धृत केली असली तरी त्याव्यतिरिक्त पितामहाच्या धनविभाजनाचे बाबतीत पित्याची इच्छाच ते प्रमाण मानतात – ('पितुरिच्छातः एव विभागः, न पुत्रेच्छया इति सिद्धम्' २.२०; एवं च पितामहधनस्यापि पितुरिच्छयैव विभागः कार्यः, २.३३) त्या धनातील श्रेष्ठ भाग ज्येष्ठाला देऊन अथवा सर्वच पुत्रांना समान अंश देऊनही तो विभाजन करू शकतो असे सांगून जीमूतवाहन पित्याला विशेष अधिकार प्रदान करतात.

४) पितामहाच्या धनातील पित्याच्या अंशासंबंधी मिताक्षरा व दायभागात मतभिन्नता आढळते.

'पित्याने पैतृक संपत्तीतील भागद्वय घ्यावा' असे जीमूतवाहन सांगतात.[११] ते म्हणतात, भावांमध्ये ज्येष्ठ भावाला संपत्तीतील २ भाग जर मिळतात तर अत्यंत पूज्य मानलेल्या, ती संपत्ती विकण्याचा वा तिची दानादीद्वारे विल्हेवाट लावण्याचा हक्क असलेला आणि पितामह व पौत्र यांचा संबंध जुळविणारा जो पिता, त्याला भागद्वय[१२] कां मिळू नयेत ? या मताच्या पुष्टीसाठी नारद, बृहस्पति यांची वचने ते उद्धृत करतात.

याउलट 'द्वावंशौ प्रतिपद्येत विभजन्नात्मनः पिता' हे पित्याला भागद्वयाचा अधिकार देणारे नारदवचन स्वार्जित धनासंबंधी आहे, असे मिताक्षरा मानते.

## भ्रातृकर्तृक–विभाग

पिता जीवित असताना धनाचे विभाजन करण्याचा तोच अधिकारी असतो,

त्याच्या निधनानंतर मात्र त्याच्या पुत्रांना विभाजनाचा अधिकार असतो.

जीमूतवाहन आणि विज्ञानेश्वर या दोघांनीही 'मातापित्याच्या मृत्युनंतर पुत्रांनी धनविभाजन करून घ्यावे' असे सांगितले आहे.

दायभागात पितृनिधनानंतर पुत्रांमध्ये होणाऱ्या विभाजनाविषयी सांगतात[१३] की, पित्याच्या निधनानंतर धनासंबंधीचे सर्व हक्क पुत्रांकडे येतात. पण पित्याचे निधन झाले असून माता जीवित असली तर सोदर भावांनी त्यांच्यात धनाचे विभाजन करू नये. कारण माता व पित्याच्याही निधनानंतर सोदर भावांनी पैतृक धनाचे विभाजन करावे असे, 'ऊर्ध्वं पितुश्च मातुश्च' या वचनाद्वारे मनुने सांगितले आहे.

या वचनातील 'पैतृक' पदाने फक्त पितृधनाचाच निर्देश केला आहे आणि त्या 'पैतृक'पदावरून मातृधनाचाही बोध घ्यावा असे समजण्यास काहीच प्रमाण नाही, असे जीमूतवाहन सांगतात. कारण 'जनन्यां संस्थितायां' याद्वारे मातेच्या निधनानंतर होणाऱ्या मातृधन-विभागाविषयी स्वतंत्र उल्लेख केलेला आढळतो.

यावर मिताक्षरा असा आक्षेप घेते की,[१४] उपर्युक्त मनुवचन हे पितामहाच्या पैतृकधनासंबंधी नसून मातापित्याच्या स्वार्जित संपत्तीबद्दल त्यात सांगितले आहे. मिताक्षरेच्या मते, पित्याच्या स्वार्जित धनाप्रमाणे मातेच्याही स्वार्जित धनावर पुत्रांना जन्मत:च अधिकार प्राप्त होतो. परंतु स्वतंत्रतेच्या अभावी पिता अथवा मातेच्या इच्छेविरुद्ध पुत्र हे माता-पित्याच्या स्वार्जित धनाचा विभाग मागू शकत नाहीत.

मातापित्याच्या मृत्युनंतर धनविभाजन करण्याविषयी दायभाग आणि मिताक्षरा दोघेही सांगतात. याज्ञवल्क्य पुत्रांमध्ये होणाऱ्या विभाजनाविषयी सांगतात,[१५] ''मातापित्याच्या मृत्युनंतर सर्व पुत्रांनी पित्याचे धन आणि ऋणाचे समविभाजन करावे. मातेचे धन कन्यांनी घ्यावे व त्यांच्या अभावी मातेचे धनही पुत्रांनी घ्यावे.''

पित्याच्या ऋणाचेही समविभाजन करण्याविषयीचा निर्देश दायभाग-मिताक्षरा दोन्हीमध्येही आढळतो.

जीमूतवाहन वर उल्लेखिलेल्या कालाव्यतिरिक्त आणखी एका कालाचा बृहस्पतिवचनाद्वारे उल्लेख करतात.[१६] ज्यात सांगितले आहे की, मातापित्याच्या

निधनानंतरच पुत्रांमध्ये संपत्तीचे विभाजन व्हावे आणि समजा ते दोघेही जीवित आहेत तर मातेची रजोनिवृत्ती झाली असावी.

मातापित्याच्या निधनानंतर पुत्रांनी विभाग घेऊन वेगळे व्हावे की अविभक्तच रहावे यासाठी 'भावांनी एकत्रच रहावे' असे सांगणारी वचने दोघांनीही उद्धृत केली आहेत. 'भाऊ एकत्रच राहिल्यास त्यातील ज्येष्ठ पुत्राने सर्व धन घेऊन इतर भावांचे पालन करावे' असा उल्लेख दोघेही करतात. अथवा 'दुसरा योगक्षेमशक्त भाऊही ज्येष्ठ पुत्राची जागा घेऊ शकतो' असे दोघेही सांगतात.

सर्व भाऊ एकत्रच राहू शकतात अथवा विभक्तही राहू शकतात. परंतु त्यांना अविभक्त रहायचे असल्यास सर्वांची संमती आवश्यक असल्याचा स्पष्ट निर्देश जीमूतवाहनांनी केला आहे.[१७]

विभाग हा साधारणत: प्राप्तव्यवहार अशा भागीदारांमध्येच होतो, परंतु कात्यायनाचे वचन उद्धृत करून जीमूतवाहन सांगतात की,[१८] "अप्राप्तव्यवहार अशी मुले आणि परदेशात गेलेल्या व्यक्तींचा संपत्तीतील विभाग त्या व्यक्तींचे नातेवाईक अथवा मित्रांजवळ इतर व्यवहारप्राप्त भागीदारांनी ठेवावा."

१५ वर्षपर्यंत एखादी व्यक्ती अज्ञान असून नंतर ती सज्ञान म्हणजेच व्यवहारप्राप्त म्हणविली जाते.[१९]

पुत्रांमध्ये होणाऱ्या धनविभाजनासंबंधीचे नियम पौत्र आणि प्रपौत्रांच्या बाबतीतही लागू होतील असा स्पष्ट उल्लेख जीमूतवाहनांनी केला आहे. याचे कारण ते देतात की, पुत्रापासून पौत्रापर्यंतचे वारस श्राद्धाधिकारी असल्याने अर्थातच त्या पूर्वजांच्या धनग्रहणाचेही सारखेच अधिकारी असतात.[२०]

सारांश, जीमूतवाहनांनी भ्रातृकर्तृकविभागाविषयी सविस्तर विवेचन केले आहे. तेवढे मिताक्षराने केलेले नाही.

## पत्नीला मिळणारा विभाग

पिता धनविभाजन करीत असता पुत्रांबरोबरच त्याची पत्नीसुद्धा विभाग घेण्याची अधिकारी असते. पत्नीला मिळणाऱ्या विभागाविषयी याज्ञवल्क्य सांगतात[२१] – पती स्वत:हून पुत्रांना विभाग देतो तेव्हा अथवा पुत्रांनी पित्याला

विभाग मागितला तर पत्नीला पुत्रांइतकाच विभाग मिळतो. मात्र त्या स्त्रीला पती अथवा सासरा यांच्याकडून स्त्रीधन मिळालेले नसावे.

अर्थातच 'हा विभाग तिला पतीच्या इच्छेनेच मिळू शकतो, स्वत:च्या नव्हे' असा स्पष्ट निर्देश मिताक्षरा करते.[२२]

त्या स्त्रीला स्त्रीधन मिळाले असल्यास तिला, अर्धांश मिळावा असे याज्ञवल्क्य 'दत्ते त्वर्धं प्रकल्पयेत्' याद्वारे सांगतात.

पत्नीला मिळणाऱ्या विभागाविषयी जीमूतवाहनाची मते याज्ञवल्क्यांच्या मतांप्रमाणेच आहेत. 'पित्याने पुत्रांमध्ये धनाचे समविभाजन केल्यास पुत्रहीन स्त्रियांना पुत्रांना मिळणाऱ्या विभागाइतकाच विभाग मिळावा, पुत्रवती स्त्रियांना नव्हे, असे जीमूतवाहन याज्ञवल्क्यवचनाद्वारे सांगतात.[२३]

## मातेला मिळणाऱ्या विभागाविषयी

पित्याच्या मृत्युनंतर पुत्र जेव्हा धनविभाजन करतात तेव्हा मातेला पुत्रांना मिळणाऱ्या विभागाइतकाच विभाग मिळतो असे याज्ञवल्क्य सांगतात.[२४]

जोपर्यंत पुत्र अविभक्त आहेत, तोपर्यंत मातेला विभाग मागण्याचा अधिकार नसतो आणि स्त्रीधन मिळाले असल्यास तिचा विभाग कमी केला जातो.

मातेला मिळणाऱ्या विभागाविषयी जीमूतवाहनांची मते याज्ञवल्क्यांप्रमाणेच आहेत. पती अथवा श्वशुर यांच्याकडून स्त्रीधन मिळाले नसता पुत्रांइतकाच अंश पत्नी व मातेला मिळावा असे दोघेही सांगतात.

पुत्रहीन स्त्रियांबद्दल त्यांना पुत्रांइतकाच विभाग मिळावा हे सांगून जीमूतवाहन ''पुत्रभागानुसारेण मातर: भागहारिण्य:'' या विष्णुवचनाद्वारे 'पुत्रांना वर्णक्रमानुसार जसे ४, ३, २, १ असे विभाग मिळतात, त्याचप्रमाणे मातांनाही वर्णक्रमानुसार विभाग मिळावेत' असा विशेष उल्लेख करतात.

## असंस्कृत भ्रातृसंस्करण
## असंस्कृत भगिनीसंस्करण

भ्रातृकर्तृकविभागाविषयीची मते जाणून घेतल्यावर त्या विभागातीलच एक आवश्यक भाग म्हणून अथवा पित्याच्या निधनानंतरचे भावाचे अतिशय महत्त्वाचे

कर्तव्य म्हणून या प्रकरणाचे प्रयोजन.

पिता जीवित असल्यास असंस्कृत पुत्र-कन्या यांचे संस्कार करण्याची जबाबदारी त्याचीच असते. पित्याच्या निधनानंतर ते संस्कार अवश्य केले जावेत असे याज्ञवल्क्य आणि जीमूतवाहन सांगतात.

पित्याचे निधन झाल्यानंतर भावांमध्ये संपत्तीचे विभाजन झाले. त्या भावांपैकी ज्यांचे उपनयन-विवाहादि संस्कार झाले आहेत त्यांनी असंस्कृत भावांचे संस्कार समाईक द्रव्यातून करावेत असे मिताक्षरा[२५] आणि जीमूतवाहन[२६] सांगतात.

भावांचे संस्कार पैतृकधनातून केले जावेत. परंतु पैतृकधनाचा अभाव असल्यास - ''पित्याचे धन नसल्यास ज्यांचे संस्कार पूर्वी झाले आहेत त्या भावांनी स्वत:च्या हिश्श्यातून संस्कार न झालेल्या भावांचे संस्कार करावेत'' असे जीमूतवाहन सांगतात.

संस्कार न झालेल्या भगिनींचे संस्कार भावांनी स्वत:च्या हिश्श्यातील १/४ धन वापरून करावेत. याविषयी याज्ञवल्क्य आणि जीमूतवाहन सांगतात, 'भागिन्यश्च निजादंशात् दत्त्वांशं तु तुरीयकम्'

जाति-वैषम्य आणि भ्रातृभगिनींचे संख्यावैषम्य असताना पितृधनाची व्यवस्था कशी केली जाईल हे मिताक्षरेने सविस्तर सांगितलेले आहे. सारांश, कन्या ही ब्राह्मणस्त्रीपासून झालेली असो वा क्षत्रियस्त्रीपासून, तिला ब्राह्मण अथवा क्षत्रिय पुत्राच्या वाटेला जेवढा अंश येतो त्याचा १/४ भाग प्राप्त होतोच, असे मिताक्षरा सांगते.

जीमूतवाहनही हेच सांगतात की,[२७] पुत्रांना जेवढा अंश प्राप्त होतो, त्याचा १/४ भाग अविवाहित मुली प्राप्त करतात. यापुढे ते सांगतात की, धन कमी असल्यास भगिनींना विवाहासाठी १/४ भाग द्यावा हे तेव्हाच लागू पडते जेव्हा पुत्र व कन्या यांची संख्या समान असते. कारण त्यांची संख्या विषम असल्यास अशी आपत्ती ओढवेल की, पुत्र ४-५ असून कन्या एकच असल्यास सर्व भावांकडून तिला १/४ प्राप्त होईल आणि सर्व भावांचे धन कमी होऊन बहिणीला बरेच धन मिळेल. याउलट कन्या जास्त आणि पुत्र एकच अशी परिस्थिती असताना सर्व भगिनींना १/४ भाग देता-देता पुत्र संपूर्ण निर्धनच होऊन

जाईल.[२८]

तर मिताक्षरा याचे स्पष्टीकरण देते 'भगिन्यश्च निजादंशत्' या याज्ञवल्क्य वचनाचा 'त्या अविवाहित कन्येला त्या विभागाचा १/४ भाग मिळावा, जो विभाग तो पुत्र असता, तर मिळाला असता, यावरून पित्याच्या पश्चात् कन्यासुद्धा अंशभागिनी ठरते.[२९]

याचे खंडन करून जीमूतवाहन म्हणतात की, 'भगिन्यश्च निजादंशात्...' हे याज्ञवल्क्य वचन भगिनींची संस्कार्यता सांगते. त्यांचा वारसाहक्क सांगत नाही. म्हणून मिताक्षरेप्रमाणे मुलींनाही पुत्रांसारखा वारसाहक्क असतो, असे समजू नये. तर भावांकडून मिळालेली भेट या स्वरूपात त्या १/४ अंश मिळवितात, असे जीमूतवाहनांचे मत आहे.

पित्याकडून आलेले धन विपुल असल्यास विवाहाला लागेल तेवढा खर्च द्यावा आणि धनाचे प्रमाण कमी असल्यास १/४ भाग द्यावा हे जीमूतवाहन सांगतातच. तर विज्ञानेश्वर ''ब्राह्मण, क्षत्रिय इ. वर्णानुसार १/४ वा १/३ इतका भाग द्यावा अशी व्यवस्था सांगतात. कन्या या ब्राह्मण वर्णाची असता १/४ पेक्षा कमी भाग देऊ नये, असे सांगितले आहे.

याज्ञवल्क्य व जीमूतवाहनांनी सांगितलेला 'लहान भावाचे उपनयन विवाहादि संस्कार हे पैतृकधनातून केले जावेत' हा नियम फक्त भावांनाच लागू पडतो. इतर वारसांपर्यंत या नियमाचा विस्तार नाही.

जीमूतवाहनांनी अपुत्रधनविभाजन नामक प्रकरणात 'अपुत्रांच्या पत्नीचा धनाधिकार' सांगताना 'तिने असंस्कृत कन्यांच्या संस्कारार्थ १/४ भाग द्यावा (अर्थातच पुत्रांचा अभाव असल्यास) असे सांगितले आहे.[३०]

याठिकाणी एक विशेष मुद्दा नमूद करावासा वाटतो की, उपनयनादि संस्कार न झालेल्या भावांसाठी धनाची विभागणी करतेवेळी सोय केली जावी हा जो याज्ञवल्क्य प्रभृतींनी सांगितलेला कायदा, तो अजूनही लागू केला जातो. तसेच धनाचे विभाजन करतेवेळी अविवाहित मुलींना विवाहासाठी लागणारा खर्च दिला जातो, हाही नियम अजूनही पाळला जातो.

अशा रीतीने असंस्कृत भ्रातृ-भगिनी संस्करण यावरील जीमूतवाहन आणि विज्ञानेश्वर यांची मते आपण पाहिली.

# संदर्भसूची

१. विभागं चेत्पिता कुर्यादिच्छया विभजेत्सुतान्।
ज्येष्ठं वा श्रेष्ठभागेन सर्वे वा स्यु: समांशिन:।। – याज्ञवल्क्य स्मृती २.११४

२. अयं च विषमो विभाग: स्वार्जितद्रव्यविषय: पितृक्रमायाते तु समस्वाम्यस्य वक्ष्यमाणत्वान्नेच्छया विषमो विभाग: युक्त: – याज्ञवल्क्य स्मृती (२.२२७) वरील टीका

३. अस्मन्मते तु इच्छया विभजेदिति स्वोपात्तधनविषयम्।
श्रेष्ठांशता–समानांशतयोस्तु पैतामहधन–गोचरत्वमिति न किमप्यनर्थकम्। – 'दायभाग' पृ.क्र. ५४

४. न्यूनाधिक विभक्तानां धर्म्य: पितृकृत: स्मृत: – याज्ञवल्क्य २.११७, 'दायभाग', पृ.क्र.५३

५. पितैव वा स्वयं पुत्रान् विभजेद्वयसिस्थित:। ज्येष्ठं वा श्रेष्ठभागेन यथा वास्य मतिर्भवेत्। नारद १३.४, दायभागात उल्लेखित पृ.क्र. ५५

६. मनु ९.२१५, दायभाग २.८६

७. याज्ञवल्क्य स्मृती २.१२१

८. अनेकपितृकाणां तु पितृतो भागकल्पना – याज्ञवल्क्य स्मृती २.१२०

९. Suppose A, B, C, D, E, F, G, H, J, K formed a joint family and the ABCD all die without making a partition, B leaving a son E, C leaving 2 sons, F, G and D leaving 3 sons, HJK.




If E, F, G, H, J, K want partition, then these six will not take 1/6 each, but the partition will be through their fathers i.e. E the only son of B will take 1/3, F and G will take 1/3 (i.e. each one will take one sixth) and H,

J, K will together take one third (i.e. one ninth each) - History of Dharmashastra, Vol III, P. 638, By P. V. Kane.

१०. अयं च धारेश्वरपुरस्कृतो वचनार्थः। पृ.क्र. १८५

११. अतः पैतामहादि धने पितुर्भागद्वयं .....' – जीमूतवाहन, 'दायभाग' २.२०

१२. ''तदेवमुक्त – प्रबन्धेन यत्र ज्येष्ठभ्रातुरेव पितृधने भागद्वयं, कथं तत्र जनकस्य दानविक्रयपरित्यागक्षमस्य पितामहधनसम्बन्धमूलस्यातिगुरोः पितुरेव स्वपितृधने भागद्वयं न सम्भवति'' – जीमूतवाहन, दायभाग २.४६

१३. मातरि जीवन्त्यां ..... सत्यपि पित्रुपरमाद्धनस्वामित्वे धर्म्यो न विभागः सोदराणां भवतीति कथ्यते' ऊर्ध्वं पितुश्च मातुश्चेति (मनु ९.१०४) उभयोरुपरमे सोदराणां पैतृकधन–विभागस्य ज्ञापनात्। – दायभाग, ३.१

१४. जीवतोः ..... अस्वतन्त्रः स्याज्जरयापि समन्वितः इति एतदपि पारतन्त्र्यं मातापित्रार्जितद्रव्यविषयम्। तथा अनीशास्ते हि जीवतोः इत्येदपि। – याज्ञवल्क्य स्मृतीवरील मिताक्षरा टीका २.१२१

१५. विभजेरन् सुताः – पित्रोः ऊर्ध्वं रिक्थमृणं समम्। मातुर्दुहितरः शेषमृणात् ताभ्यः ऋतेऽन्वयः।। – याज्ञवल्क्य स्मृती २.११७

१६. पित्रोरभावे पुत्राणां विभागः सम्प्रदर्शितः। मातुर्निवृत्ते रजसि जीवतोरपि शस्यते। – व्यास – जीमूतवाहन, 'दायभाग' ३.८ मध्ये उल्लेखित.

१७. 'सर्वस्वं वा पूर्वजस्य स इतरान् बिभृयात् पितृवत्' (गौतम २८.३) वा शब्दात् पृथग्वा भवेयुः सह वा वसेयुः। सहवासश्च सर्वेषामिच्छात एव। – दायभाग ३.१५

१८. अतएव विभागं प्रक्रम्याह कात्यायनः। अप्राप्तव्यवहाराणां धनव्यय–विवर्जितम्। न्यसेयुः बन्धुमित्रेषु प्रोषितानां तथैव च।। – दायभाग ३.१७

१९. अप्राप्तव्यवहारा बालकाः पञ्चदशवर्षानधिक वयस्काः। – दायभाग, ३.१७ वरील श्रीकृष्ण यांचे भाष्य

२०. प्रपितामहग्रहणात् पुत्रपदं प्रपौत्रपर्यन्तपरम्। तदनेन प्रपौत्रपर्यन्तस्य श्राद्धदानेन प्रतितामहपर्यन्तोपकारकत्वात् तुल्यो दायाधिकारः। – दायभाग ३.१८

२१. यदि कुर्यात् समानंशान् पत्न्य: कार्या: समांशिका: । न दत्तं स्त्रीधनं यासां भर्त्रा वा श्वशुरेण वा ।। – याज्ञवल्क्य स्मृती २.११५

२२. तस्मात् भर्तु: इच्छया भार्याया अपि द्रव्यविभागो भवत्येव न स्वेच्छया । यथा वक्ष्यति यदि कुर्यात् ..... इति । – याज्ञवल्क्य २.५२ वरील मिताक्षरा टीका.

२३. पुत्रहीनाश्च पितु: पत्न्य: समानांशा: न पुत्रवत्य: ।

२४. पितुरूर्ध्वं विभजतां माताऽप्यंशं समं हरेत् । – याज्ञवल्क्य २.१२३

२५. पितु: ऊर्ध्व: विभजद्भि: भ्रातृभि: असंस्कृता भ्रातर: समुदायद्रव्येण संस्कर्तव्या: । – याज्ञवल्क्य २.१२४

२६. कर्तव्या भ्रातृभि: तेषां पैतृकादेव तद्धनात् । – नारद १३.३३, दायभाग ३.४२ मध्ये उल्लेखित.

२७. अनूढानां दुहितॄणां पुत्रभागमनुसृत्य तश्चतुर्थांश: । – जीमूतवाहन, दायभाग ३.३४

२८. एतच्च कन्यापुत्रयो: समसंख्यत्वे ज्ञातव्यं, विषमसंख्यत्वे च कन्याया एव बहुतरधनं वा स्यात् पुत्रस्य वा निर्धनता स्यात् न चैतदुचितं पुत्रस्य प्राधान्यात् । – जीमूतवाहन, दायभाग ३.४०

२९. निजादंशात् चतुर्थांशं दत्वा । अनेन दुहितरोऽपि पितुरूर्ध्वमंशभागिन्य: इति गम्यते । न च निजादंशात् दत्वांशं तु तुरीयकम् इति तुरीयांशं अविवक्षया संस्कारमात्रोपयोगि द्रव्यं दत्वेति व्याख्यानं युक्तं मनुवचनविरोधात् स्वेभ्योंशेभ्यस्तु ..... पतिता स्युरदित्सव: ।' पतिता: स्युरदित्सव इत्यकरणे प्रत्यवायश्रवणादवश्यं दातव्यता प्रतीयते । – याज्ञवल्क्य स्मृती २.१२४ वरील मिताक्षरा टीका.

३०. पत्न्या च भर्तृधनात् कन्यायै विवाहार्थं तुरीयांशो देय: पुत्राणामेव तद्दानप्रतिपादनात् दण्डअपूपन्यायेन पत्न्यादीनां दानम् । – जीमूतवाहन, दायभाग ११.१.६६



## प्रकरण पाचवे

# विशेष–विभागपद्धती

पिता, माता, पुत्र सर्व असतांना केलेले धनविभाजन, तसेच पित्याच्या मृत्युनंतर भावांनी केलेले धनविभाजन असे सर्वसाधारण परिस्थितीत केल्या जाणाऱ्या धन–विभाजनाविषयी आपण पाहिले. परंतु काही वेळा या विभागाचे बाबतीत विशेष परिस्थिती निर्माण झालेली असते. अशावेळी विभाजन कसे केले जाते, ते पाहू.

## १) विभागान्तर–जात विभाग

पुत्रांमध्ये संपत्तीचे विभाजन झाल्यावर जर त्यांना भाऊ झाला तर तो विभागाचा अधिकारी असतो आणि पित्याच्या मृत्युनंतर पुत्रांमध्ये विभाजन होत असता माता गर्भधारिणी असेल पण ही गोष्ट पुत्रांना माहित नसली तर पुत्रांमध्ये विभाजन झाल्यावर काही कालाने जो पुत्र होईल, त्याला आयव्ययशोधनाद्वारे विभाग मिळावा असे याज्ञवल्क्य सांगतात.[१]

ज्यावेळी पुत्राची गर्भधारणा आणि जन्म हे दोन्ही पिता–पुत्रांमध्ये धन–विभाजन झाल्यावर झाले असेल तर त्यानंतर उत्पन्न झालेल्या पुत्राला त्याच्या पित्याच्या वाटेचा हिस्सा तसेच विभागणीनंतर मिळविलेले पित्याचे स्वार्जित धन हे दोन्हीही प्राप्त होते.

मिताक्षरा याविषयी सांगते की, विभक्तज पुत्राला पित्याच्या आणि मातेच्याही धनातील अंश मिळत असतो. तसेच मातापित्याने पूर्वीच विभक्त झालेल्या पुत्राला जर काही अलंकारादि दिले तर ते सर्व त्याच पुत्राच्या मालकीचे असते. विभागापूर्वी सुद्धा भेटीदाखल मिळालेल्या धनात इतर भावांना अंश नसतो या अर्थाचे याज्ञवल्क्यवचनही आहे.[२]

याविषयी जीमूतवाहन सांगतात की, पित्याने जर पुत्रांना स्वत:पासून विभक्त केले आणि कायद्यानुसार स्वत:साठी काही भाग राखून ठेवला व पुत्रांशी संसृष्ट न होता मरण पावला तर विभागणीनंतर उत्पन्न झालेला जो पुत्र – त्यालाच फक्त पित्याची संपत्ती मिळेल व तेवढेच धन त्याला मिळेल. परंतु पिता जर कांही

पुत्रांशी संसृष्ट होऊन मरण पावला तर संसृष्ट भावांकडून त्याला विभाग प्राप्त होईल. याविषयीचे मनुवचन[३] जीमूतवाहन उद्धृत करतात. एकापेक्षा जास्त पुत्रही विभागानंतर जन्मले तर त्या सर्वांनाच पित्याच्या संपत्तीतून अंश प्राप्त होतो. तसेच विभागापूर्वी उत्पन्न झालेल्या पुत्राचा पित्याच्या धनावर अधिकार नसतो आणि विभागानंतर जन्मलेल्या पुत्रांचा भावांच्या धनावर अधिकार नसतो, असेही सांगितले आहे. विभागानंतर जन्मलेल्या पुत्राचा पित्रार्जित संपत्तीवर तसेच पित्याने केलेले ऋण, दान, गहाण यावरही त्याचाच अधिकार असल्याचे बृहस्पतीवचनाद्वारे जीमूतवाहन सांगतात.[४] या बृहस्पतीवचनातील 'विभक्तजस्य तत्सर्वम्' याद्वारे असे सुचविले आहे की, पित्याची स्वार्जित संपत्ती कितीही जास्त असली तरी ती सर्व विभागानंतर जन्मलेल्या पुत्रांकडेच जाते.

'विभागानन्तरं यस्य गर्भाधानं स विभक्तज:' अशी विभक्तज पुत्राची व्याख्या जीमूतवाहन करतात. उदाहरणाद्वारे विभक्तज पुत्राच्या विभागाविषयी सांगता यंईल - समजा अ आणि त्याचे २ पुत्र ब, क हे अविभक्त कुटुंबातील सहभागीदार आहेत. त्यांनी संपत्तीचे विभाजन केले व प्रत्येकाने एकूण संपत्तीचा १/३ भाग घेतला. पण ६ महिन्यानंतर 'अ'च्या पत्नीला 'ड' हा पुत्र झाला तर पुन: विभागणी होऊन 'ड'ला आयव्ययशोधनाद्वारे सर्व संपत्तीचा १/४ भाग (मातेला विभाग दिला असल्यास १/४ भाग) मिळेल.

मिताक्षरा हाच नियम अशाही पुत्राला लागू होत असल्याचे सांगते, जो विभागापूर्वीच मरण पावलेल्या भावाच्या विधवा पत्नीला विभागानंतर झाला आहे परंतु त्या पत्नीला गर्भधारणा झाल्याचे इतर भावांना विभागाचे वेळी माहित नव्हते.

म्हणूनच मिताक्षरा[५] सुचविते की मृत झालेल्या काही भावांच्या पत्नी गर्भवती आहेत हे माहीत असल्यास त्यांची प्रसूती जोपर्यंत होत नाही, तोपर्यंत संपत्तीचे विभाजन पुढे ढकलावे.

वरील विवेचनावरून 'विभागानन्तरोत्पन्नस्य विभाग' या विषयाचे बाबतीत जीमूतवाहन आणि विज्ञानेश्वरांची मते सारखीच असलेली दिसतात. दोघेही असेच सांगतात की विभागणीनंतर उत्पन्न झालेल्या पुत्राला पित्याची संपत्ती प्राप्त होते आणि भावांच्या धनावर त्यांना अधिकार नसतो.

परंतु जीमूतवाहन याचा अपवाद सांगतात की, 'पितामहाची जी भूमी, निबन्ध, इस्टेट यातून विभक्तज पुत्राला विभाग प्राप्त होतो.' मिताक्षरा मात्र हा उल्लेख करीत नाही.

## २) विभागानन्तरागतविभाग

विभागाचे वेळी परदेशी गेल्याने अनुपस्थित असलेल्या आणि विभागणी झाल्यानंतर आलेल्या दायादाच्या विभागाविषयी जीमूतवाहन सांगतात –

संपत्तीची विभागणी झाली असेल किंवा नसेल, संपत्तीचा एखादा वारस जेव्हा उपस्थित होईल, तेव्हा जी काही विभागार्ह अथवा समाईक संपत्ती असेल, त्यातून त्याला विभाग मिळायलाच पाहिजे. मग ती संपत्ती म्हणजे पितामहाकडून क्रमागत आलेली भूमी, गृह, लेख्य अथवा ऋण काहीही असो. अनेक दिवस अनुपस्थित राहून नंतर आलेल्या वारसाला त्याचा नियोजित हिस्सा मिळेलच.

तसेच एखादी व्यक्ती अविभक्त कुटुंब सोडून दुसऱ्या गावी रहायला गेली तर तिचा हिस्सा तिच्या वारसांना ते परत आल्यावर मिळायला हवा. मग तो वारस ३रा, ५वा किंवा ७वा असला तरीही जन्म व नाव या पुराव्यावरून त्या वारसाला संपत्तीतील भाग मिळू शकतो. एखादा वारस जर बराच कालपर्यंत अनुपस्थित असेल तर, त्या गावात पूर्वीपासूनच रहात असलेल्या व्यक्तींची ओळख दाखवून त्या वारसाने स्वत:चा विभाग घ्यावा.

विभागानंतर आलेल्या पुत्राचा विभाग हा सिद्धच असला तरी त्या वंशातील परंपरेने जो सातवा पुरुष, त्याला मिळणाऱ्या विभागज्ञापनार्थ हा 'विभागान्तरागत विभाग' जीमूतवाहनांनी पृथग्वचनाद्वारे सांगितला आहे. कारण स्वदेशातच स्थित असलेल्या वारसांना – जे चतुर्थ पुरुषापर्यंतचे आहेत – फक्त त्यांनाच विभाग घेण्याचा अधिकार असतो.

जीमूतवाहनांनी अशा प्रकारे 'विभागान्तरागत–विभाग' सांगितलेला आहे.

विज्ञानेश्वरांनी मात्र याविषयी विशेष उल्लेख केलेला नाही.

## ३) भ्रात्रादिवञ्चनया स्थापितस्य समुदायद्रव्यस्य विभागः

पित्याच्या धनाचे विभाजन करताना – बाकीचे भाऊ लहान, अज्ञान आहेत असे पाहून ज्येष्ठ भाऊ काही भाग काढून घेऊन उरलेल्या धनाचे विभाजन करू

शकतो अथवा चुकीने वा इतर कारणांची इस्टेटीतील काही भाग विभाजन करताना राहून जाऊ शकतो. या राहून गेलेल्या भागाविषयी नंतर लक्षात आले अथवा हेतुपुरस्सर काही भाग काढलेला असून ते कृत्य मागाहून उघडकीस आले तर 'त्या धनातील समभाग सर्वांना मिळतो', असे मिताक्षरा आणि जीमूतवाहन एका याज्ञवल्क्य वचनाद्वारे सांगतात[६] ।

मनुवचनही हेच सांगते[७] ।

याज्ञवल्क्य, मनु हे 'अपहरण केलेल्या धनाचे पुनर्विभाजन व्हावे' असे सांगतात. परंतु मनु 'विभाजन एकदाच होते' असे सांगतो. या विरोधाचे समर्थन जीमूतवाहन असे करतात की, 'विभाजन हे एकदाच केले जाते' ही मर्यादा, सम्यक् विभागाविषयी आहे, दुर्विभक्त धनाविषयी सांगितलेली नाही.

यानंतर एक महत्त्वाचा मुद्दा उपस्थित होतो की, विभाजनाचे वेळी धनाचे अपहरण करणारा दोषी ठरतो अथवा नाही ?

जीमूतवाहन आणि मिताक्षरा यांचे याबाबतीत मतभेद आहेत.

याविषयीचे मनुवचन[८] उद्धृत करून विज्ञानेश्वर सांगतात, 'जो ज्येष्ठ भाऊ लोभाने लहान भावाच्या चोरून द्रव्याचे अपहरण करील तो, विभाग घेण्यासही पात्र नसतो.' याठिकाणी ज्येष्ठ भावाचा उल्लेख केला असला तरी लहान भावांनी असे अपहरण केल्यास तेही दोषी ठरतात, असे समजावे. अर्थातच धनाचे अपहरण करणे निषिद्धच मानले आहे.

हे मिताक्षरेचे मत जीमूतवाहनांना मान्य नाही. त्यांच्या मते 'स्तेन' अशा व्यक्तीला म्हटले जाते, जी व्यक्ती विशिष्ट संपत्ती दुसऱ्याच्या मालकीची आहे, हे निश्चितपणे जाणत असूनही स्वामिकृत दानविक्रयादि स्वत्वहेतूंशिवायच त्या दुसऱ्याच्या संपत्तीवर स्वत:चा हक्क स्थापन करते वा ती बळकावून बसते[९] परंतु वरील संदर्भात ते द्रव्य अविभक्तच असल्याने अपहरण करणारी व्यक्ती 'ही संपत्ती माझी आहे, व ही दुसऱ्याची आहे' असा विवेक करू शकत नाही म्हणून या अविभक्त धनाच्या अपहरणाला 'स्तेय' म्हणता येणार नाही.

दायभागाने उद्धृत केलेले कात्यायनवचनही हेच सांगते[१०] विश्वरूपही हेच सांगतात की, द्रव्यापहरणाचे बाबतीत तस्करदोष लागत नाही कारण त्याठिकाणी स्तेनधात्वर्थाची निष्पत्ती होत नाही.

जितेंद्रिय सुद्धा हेच सांगतात की, संपत्तीतील कोणता विशिष्ट भाग कोणत्या व्यक्तीचा आहे हे ज्ञान अपहरणकर्त्याला नसते म्हणून ते धनापहरण स्तेय समजले जात नाही. आणि ते स्तेय मानले तरीही ज्याअर्थी धनापहरणकर्त्याला विभाग देण्याविषयी स्मृती सांगतात, त्याअर्थी त्याला स्तेयदोष लागत नाही, असे समजावे.

जीमूतवाहनांनी अशाप्रकारे अविभक्त धनात स्वत:चेही स्व असल्याने स्वत्वबुद्धीने त्यातील धन घेतले तर ते दोषावह नसते, अशी आपली बाजू मांडली.

विज्ञानेश्वरांना मात्र हे स्पष्टीकरण मान्य नाही. त्यांच्या मते दुसऱ्याला त्याच्या भागापासून वंचित करणाऱ्या व्यक्तीला तसेच लहान भावांना अंश देताना हेतुपुरस्सर काही धन काढून ठेवणाऱ्या ज्येष्ठ भावाला दोष हा लागतोच.

यावरून आपण पाहिले की, **विज्ञानेश्वरांच्या** मते या समाईक द्रव्यावर इतर भावांचेही स्वत्व असते, त्यामुळे ते 'परधन' ठरते. 'परधनापहार' हा दोषच आहे. याउलट **जीमूतवाहनांच्या** मते या अपहरणकर्त्याला दोष लागत नाही.

धनापहरण करणाऱ्याला स्तेयदोष लागत नाही, हे विधान उचित नाही. या जीमूतवाहनांच्या म्हणण्यावर असा आक्षेप घेता येईल की, ''ही विशिष्ट संपत्ती माझी व ही दुसऱ्याची अशी मर्यादा अविभक्त संपत्तीचे अपहरण करणाऱ्याला माहित नसली तरीही त्यात दुसऱ्या व्यक्तीचा अंश आहे हे तर माहित असतेच. आणि असे मानले की, अपहरण केलेली संपत्ती योगायोगाने त्याच्याचकडे आली तर ते स्तेय ठरणारच नाही पण ती अपहृत संपत्ती त्याच्याच वाटेला येईल, दुसऱ्याच्या वाटेला येणार नाही, याला काय प्रमाण आहे ?

तेव्हा धनापहरण करणाऱ्या व्यक्तीला स्तेय दोष हा लागणारच. शेवटी हे सांगता येईल की, ''विभागाचे वेळी धन लपवून ठेवून संपत्तीचे इतर भावांमध्ये विभाजन केले, व पुढे हे लक्षात येऊन सिद्ध केले गेले तर त्या धनात सर्वांना सारखाच अंश मिळतो, याविषयी मिताक्षरा व दायभाग यांचे मत सारखेच आहे.

अशा रीतीने 'भ्रातादिवञ्चनया स्थापितस्य समुद्रायद्रव्यस्य विभाग:' यावर विज्ञानेश्वर व जीमूतवाहन यांची मते आपण अभ्यासली.

## ४) संसृष्टिधन–विभाग

'संसृष्टिधन–विभागा'विषयी बघण्यापूर्वी 'संसृष्ट' हा शब्द आधी समजावून घेणे आवश्यक आहे.

विज्ञानेश्वर याचे स्पष्टीकरण देतात – "विभक्तं धनं पुनर्मिश्रीकृत्य संसृष्टं तदस्यास्ति इति संसृष्टी"

यावरून आपल्या ध्यानात येईल की, प्रथम **अविभक्त** कुटुंब असते. त्या अविभक्त कुटुंबातील व्यक्ती धनाचे विभाजन करून **विभक्त** होतात. अर्थातच अविभक्त कुटुंबाचा लय होतो. त्यानंतर त्याच व्यक्ती – ज्यांच्यात विभाजन झाले, त्या व्यक्ती हेतुपुरस्सर आणि अर्थातच सर्व भागीदारांच्या संमतीने पुन: अविभक्त होतात – म्हणजेच संसृष्ट होतात.

अशा संसृष्ट झालेल्या व्यक्तींनाच 'संसृष्टी' म्हटले जाते.

ज्या व्यक्ती केवळ मालकी हक्काचे बाबतीत (Legal Claim) विभक्त झाल्या आहेत, त्या जर एकत्र राहू लागल्या, तर कायद्याच्या दृष्टीने त्यांना 'संसृष्ट' म्हटले जात नाही.

कोणत्या व्यक्ती संसृष्ट होऊ शकतात, हाही एक महत्त्वाचा प्रश्न आहे. याला आधार म्हणून एक बृहस्पतिवचन कायदेग्रंथांनी उद्धृत केले आहे.[११]

उपर्युक्त बृहस्पति–वचनाद्वारे जीमूतवाहन आणि विज्ञानेश्वर सांगतात, 'अविभक्त कुटुंबातील व्यक्ती एकदा विभक्त झाल्यावर पुन: संसृष्ट व्हायचे असल्यास तिला फक्त पिता भाऊ अथवा काका यांच्याशी संसृष्ट होता येते. कोणत्याही इतर नातेवाईकांशी होता येत नाही. जसे – पितामह अथवा काकांचा मुलगा इ. – जरी या व्यक्ती प्रथम विभाजन झाले, त्यावेळी अंतर्भूत असल्या तरीही.

### संसृष्टींचा धनाधिकार

विज्ञानेश्वर आणि जीमूतवाहन याज्ञवल्क्यवचनाच्या[१२] आधारे संसृष्टींच्या धनाधिकाराबद्दल सांगतात.

या वचनावरील मिताक्षरा–टीकेमध्ये संसृष्टीच्या धनाधिकाराविषयी विज्ञानेश्वर सांगतात की, "संसृष्ट व्यक्तीचे धन अन्य संसृष्ट व्यक्तीच ग्रहण

करते. सोदर भावाचे धन त्याच्या मृत्युनंतर सोदर भावालाच मिळते. सोदर संसृष्टीच्या निधनानंतर त्याला पुत्र झाला असता त्याच्या पित्याचा विभाग द्यावा. आणि पुत्र नसताना सोदर संसृष्ट भावानेच ते ग्रहण करावे.''

संसृष्ट झालेला भाऊ निपुत्रिकच मरण पावला तर भिन्नोदर परंतु संसृष्ट भाऊ व असंसृष्ट सोदर भाऊ असताना कशी धनग्रहणव्यवस्था असावी, हे सांगताना 'अन्योदर्यस्तु संसृष्टी .....' या याज्ञवल्क्यवचनावरून मिताक्षरा सांगते की, ''सोदर असंसृष्ट आणि असोदर संसृष्ट भावांमध्ये मृत संसृष्टाचे धन विभागले जाते. तात्पर्य हे की, सख्ख्या भावाखेरीज इतरांना धनग्रहणाचा अधिकार ते जर **संसृष्ट** असले तरच मिळू शकतो.तर असंसृष्ट अशा सोदर भावाला धनग्रहणाचा अधिकार केवळ तो **सोदर** असल्यानेच मिळू शकतो.

जीमूतवाहनांनीही 'संसृष्ट न झालेला सोदर भाऊ आणि संसृष्ट झालेल्या असोदर भावांमध्ये मृत संसृष्टीचे धन विभागले जाते' असेच सांगितलेले दिसते.

आपण पाहिले की, संसृष्ट कोणाला म्हणावे आणि संसृष्ट कोणत्या व्यक्तीशी होता येते याबाबत विज्ञानेश्वर आणि जीमूतवाहन यांची मते सारखीच दिसतात.

धनग्रहणाधिकाराचे बाबतीत संसृष्ट न झालेला सोदर भाऊ आणि संसृष्ट झालेला असोदर भाऊ या दोघांनाही सारखेच अधिकार विज्ञानेश्वर आणि जीमूतवाहन यांनी प्रदान केले आहेत.

## ५) विभागानधिकारी

संपत्तीच्या विभाजनाचा विचार करताना ती संपत्ती मिळविण्याचा अधिकार कोणाला आहे, हे जाणून घेणे जसे महत्त्वाचे आहे, तसेच ती घेण्याचा अधिकार कोणाला नसतो हेही जाणून घेणे तितकेच महत्त्वाचे आहे.

विज्ञानेश्वर आणि जीमूतवाहन यांनी या अनधिकारी व्यक्तींचा उल्लेख केलेला आहे[१३] तो असा - ''नपुंसक, पतित, पतित व्यक्तीचा पुत्र, पंगु, वातपित्तकफ अथवा ग्रहसंनिपात यांनी ग्रासलेला उन्मत्तक, विकलान्त:करण असा, जड-हित-अहित जाणण्यास अक्षम असलेला, ज्याचे नेत्र विकल झाले आहेत असा अन्ध, क्षयादि अचिकित्स्य रोगांनी ग्रस्त झालेला, आश्रमान्तरगत

असा, पितृद्वेष्टा, मूक-बधिर, निरींद्रिय अशा व्यक्ती विभागानधिकारी मानल्या गेल्या आहेत. त्यांना विभाग न देता त्यांचे केवळ भरणपोषण करावे.''

याबाबत एक मनुवचनही[१४] या दोघांनी प्रमाण मानले आहे.

अशा रीतीने विशेषत: शारीरिक दौर्बल्य असलेल्या व्यक्तींना विज्ञानेश्वर आणि जीमूतवाहन विभागानधिकारी ठरवितात.

धर्मानुसार वर्तन न करणाऱ्या व्यक्तींनाही जीमूतवाहन अनधिकारी ठरवितात. यासाठी त्यांनी एक आपस्तंबवचन[१५] उद्धृत केले आहे, ज्यात आपस्तंब सांगतात, ''जे सद्‌गुणी आहेत, ते सर्वच वारस संपत्तीचे अधिकारी असतात. परंतु आपल्या दुर्गुणांनी जो संपत्ती उधळून टाकतो, तो पुत्र ज्येष्ठ असला तरीही विभाग घेण्यास पात्र नसतो.

बृहस्पतिवचना[१६]द्वारे जीमूतवाहनांनी समान वर्णाच्या स्त्रीपासून झालेला असूनही सद्‌गुणांचा अभाव असलेल्या व्यक्तीला संपत्तीचा अनधिकारी मानले आहे.

जीमूतवाहनांच्या मते पुत्र हा आपल्या पित्याचे पुं नामक नरकापासून रक्षण करतो. म्हणूनच त्याला पुत्र हे अभिधान मिळाले आहे. एका बृहस्पतिवचनाद्वारे जीमूतवाहन सांगतात की, ''संपत्तीच्या स्वामीला पिंडदान करणारे जे आहेत, त्यांच्याकडेच पैतृकधन जाते. जो पुत्र पित्याला ऋणमुक्त करीत नाही, तो अनुपयोगीच होय.'' असे सांगून पित्याचे नरकातून रक्षण करणाऱ्याला श्रेष्ठ मानून विभागाचा अधिकारी मानले आहे. अर्थातच याउलट असलेल्या पुत्राला ते अनधिकारी मानतात.

यावरून पित्याचे **और्ध्वदेहिक** करणे हे पुत्राचे कर्तव्य असले तरी तो त्याचा एक सद्‌गुण असून संपत्तीतील विभाग मिळवून देणारा ठरतो, असे जीमूतवाहन मानतात.

जीमूतवाहनांनी यात आणखी कांहींचा अनधिकारी म्हणून समावेश केला आहे. जसे - नियमबाह्य पद्धतीने विवाहबद्ध झालेल्या स्त्रीचा पुत्र, सगोत्र-विवाहापासून झालेला पुत्र, तपस्वीजनांच्या दृष्टीने धर्मभ्रष्ट असणारा पुत्र इ.

नियमबाह्य पद्धतीने विवाहबद्ध झालेल्या स्त्रीचा पुत्र विभाग घेण्याचा अधिकारी नसतो. यावरून जीमूतवाहन नियमबाह्य विवाहाला इतके निषिद्ध

मानतात की, त्या स्त्रीच्या पुत्राला जीमूतवाहनांनी अनंशच ठरविले आहे. विवाह हा नियमानुसारच व्हावा असे ते म्हणतात कारण नियमानुसार विवाह झाला असता तो अधर्मवर्णाच्या स्त्रीशी झाला तरीही तिच्यापासून झालेला पुत्र हा विभागाधिकारी असतो असे जीमूतवाहनांचे स्पष्ट मत आहे.

अशाप्रकारे नियमबाह्य विवाहापासून झालेल्या पुत्राला अनंश ठरवून नियमबाह्य विवाहाला मर्यादा घालण्याचा जीमूतवाहनांनी प्रयत्न केला असला तरी अशा पुत्रांना विभाग मिळू नये, हे पटत नाही. कारण व्यक्तिशः त्या पुत्राचा काहीच दोष नसताना त्याला मातापित्याच्या अपराधाची शिक्षा मिळावी हे योग्य वाटत नाही.

विभागानधिकारी व्यक्तींमध्ये कांही असे आहेत की, ज्यांच्यात अनधिकारी ठरविणारे दोष जन्मतःच असतात. परंतु अनधिकारी व्यक्ती या जन्मापासूनच अनधिकारी असतात, असे नाही. याविषयी मिताक्षरा[१७] सांगते की, विभागणी होण्यापूर्वी जर अनधिकारी ठरविणारा एखादा दोष आला तर ती व्यक्ती अनंश ठरते. परंतु विभागणी झाल्यावर एखादा दोष उद्भवला तर मात्र त्यांना एकदा मिळालेला अंश परत घेतला जात नाही. तसेच विभागणीचे वेळी सदोष असल्याने विभाग मिळाला नाही व पुढे औषधोपचारांनी तो दोष नाहीसा झाला तर विभक्तज पुत्रांप्रमाणे पुनः विभागणी होऊन विभाग मिळतो.

हे अनधिकारी लोक विभाग मिळविण्यास पात्र नसले तरी सर्वांना अन्नवस्त्र मिळविण्याचा अधिकार असतो. याज्ञवल्क्य हेच सुचवितात की, अशा व्यक्तींना विभाग मिळत नसल्याने याबाबतीत त्यांची व्यवस्था करणे अत्यावश्यकच आहे.

जीमूतवाहन मात्र सर्वच अनधिकारी व्यक्तींना भरणपोषणासाठी योग्य मानीत नाहीत. मात्र पतित व त्याचा पुत्र वगळून इतरांचे पोषण करावे असे देवलवचना[१८]द्वारे सांगतात.

विज्ञानेश्वर आणि जीमूतवाहन या दोघांनीही याज्ञवल्क्यवचना[१९]च्या आधारे असे सांगितले आहे की, ''क्लीबादि जरी विभागानधिकारी असले तरी त्यांच्या दोषरहित पुत्रांना विभाग मिळावा आणि त्यांच्या कुटुंबियांचे पोषण व्हावे.'' औरस आणि क्षेत्रज अशा स्पष्ट निर्देशावरून इतर पुत्रांना दाय मिळत नाही, हे उघड आहे.

क्लीबादींच्या पत्नींविषयी सांगितले आहे की, त्या निपुत्रिक स्त्रिया सच्छील असतील, तरच त्यांना अन्नवस्त्र देऊन त्यांचे भरणपोषण करावे, अन्यथा नाही.

अशाप्रकारे 'विभाग घेण्यास अपात्र असणाऱ्या व्यक्ती' या विषयावरील जीमूतवाहन आणि मिताक्षरा यांची मते आपण पाहिली.

याठिकाणी हे नमूद करणे आवश्यक आहे की, विभागानधिकारी व्यक्तींविषयी सांगणारी मनु, याज्ञवल्क्य यांची वचने भारतीय न्यायालयांकडून कित्येक खटल्यांचे बाबतीत उद्धृत केली गेली आहेत. Disabilities Removal Act of 1028 हा अस्तित्वात आल्यावर विभागानधिकारी व्यक्तींविषयी सांगितलेल्या नियमांमध्ये बराच फरक पडला आहे. त्यामुळे दायभाग पंथाच्या अधिकाराखाली असलेल्या व्यक्तींव्यतिरिक्त म्हणजेच मिताक्षरा कायद्याच्या अधिकाराखाली असलेल्या व्यक्तींच्या बाबतीत सर्व भारतीयांसाठी हे कायद्याचे नियम लागू आहेत. या नियमानुसार 'फक्त जन्मत:च असलेल्या मूर्खता आणि डोके फिरलेले असणे' या कारणांमुळेच ती विशिष्ट व्यक्ती अनंश ठरविली जाते.

अशा रीतीने 'विशेष विभागपद्धती' या विषयावरील विज्ञानेश्वर व जीमूतवाहन यांनी केलेले सविस्तर विवेचन आपण पाहिले.

## संदर्भसूची

१. विभक्तेषु सुतो जात: सवर्णायां विभागभाक् ।
दृश्याद्वा तद्विभाग: स्यादायव्ययविशोधितात् ।।
– याज्ञवल्क्य–स्मृती, २.१२२

२. पितृभ्यां यस्य यद्दत्तं तत्तस्यैव धनं भवेत् ।
– याज्ञवल्क्य–स्मृती २.१२३

३. ऊर्ध्वं विभागाज्जातस्तु पित्र्यमेव हरेद्धनम् ।
संसृष्टास्तेन वा ये स्यु: विभजेत् स तै: सह ।।
– मनु ९.२१६, नारद १३.४३.
– दायभाग ७१. मध्ये उल्लेखित

४. पुत्रै: सह विभक्तेन पित्रा यत् स्वयमर्जितम् ।
विभक्तजस्य तत् सर्वमनीशा: पूर्वजा: स्मृता: ।

यथा धने तथर्णेऽपि दानाधानक्रयेषु च ।। – बृहस्पति

– दायभाग ७.६ मध्ये उल्लेखित

५. याज्ञवल्क्य २.१२२ वरील मिताक्षरा टीका –

........ स्पष्टगर्भायां तु प्रसवं प्रतीक्ष्य विभागः कर्तव्यः ।

६. अन्योन्यापहृतं द्रव्यं विभक्ते यत्तु दृश्यते ।

तत्पुनस्ते समैरंशैः विभजेरन्निति स्थितिः ।।

– याज्ञवल्क्य २.१२६. दायभाग १३.३ मध्ये उल्लेखित

७. ऋणे धने च सर्वस्मिन् प्रविभक्ते यथाविधि ।

पश्चाद्दृश्येत यत्किञ्चित् तत्सर्वं समतां नयेत् । – मनुस्मृती ९.२१८

– दायभाग १३.१ मध्ये उल्लेखित

८. यो ज्येष्ठो विनिकुर्वीत लोभात् भ्रातॄन्यवीयसः ।

सोऽज्येष्ठः स्यादभागश्च नियन्तव्यश्च राजभिः ।। – मनु ९.२१३

– याज्ञवल्क्य–स्मृती वरील (२.१२६) मिताक्षरा टीकेत उल्लेखित

९. य एव हि परस्येदमिति विशेषं जानानः परस्वे स्वत्वहेतुमन्तरेणैव स्वत्वमारोपयति स स्तेन इति लोकप्रसिद्धोऽर्थः न चात्रेदं परकीयं इदं वा ममेति विभक्तं शक्नोति द्रव्यस्य अविभक्तत्वात् । ...... न एतन्मम धनं परस्येदमिति जानत एव भवतीति न साधारणधनापहारे स्तेयनिष्पत्तिः ।

– जीमूतवाहन – दायभाग १३.८

१०. तदुक्तं विश्वरूपेणापि अतः तस्करदोषो नास्तीति वचनारम्भसामर्थ्यात् स्तेनधात्वर्थानिष्पत्तेरित्यभिप्रायः । – जीमूतवाहन – दायभाग १३.११–१३

११. विभक्तो यः पुनः पित्रा भ्रात्रा चैकत्र संस्थितः ।

पितृव्येणाथवा प्रीत्या स तु संसृष्ट उच्यते ।। – बृहस्पति २५.७२

– याज्ञवल्क्य–स्मृती २.१३८ वरील मिताक्षरा टीका आणि जीमूतवाहन. दायभाग १२.३

१२. संसृष्टिनस्तु संसृष्टी सोदरस्य तु सोदरः ।

दद्यादपहरेच्चांशं जातस्य च मृतस्य च ।

अन्योदर्यस्तु संसृष्टी नान्योदर्यौ धनं हरेत् ।

असंसृष्टच्यपि चादद्यात्संसृष्टो नान्यमातजः ।। – याज्ञवल्क्य २.१३८–१३९.

– जीमूतवाहन द्वारा दायभाग ११.१०, ११.१३ मध्ये उल्लेखित

१३. क्लीबोऽथ पतित: तज्ज: पङ्गुरुन्मत्तको जड: ।
अन्धो अचिकित्स्यरोगाद्या भर्तव्या: स्युर्निरंशका: ।। – याज्ञवल्क्य २.१४०
– जीमूतवाहन द्वारा दायभाग (५.१०) मध्ये उल्लेखित

१४. अनंशौ क्लीबपतितौ जात्यन्धबधिरौ तथा उन्मत्तजडमूकाश्च ये च केचिन्निरीन्द्रिया: ।। – मनुस्मृती ९.२०१
– याज्ञवल्क्य–स्मृती (२.१४०) वरील मिताक्षरा टीका आणि जीमूतवाहनद्वारा दायभाग (५.७) मध्ये उल्लेखित

१५. सर्वे हि धर्मयुक्ता भागिन: द्रव्यमर्हन्ति ।
यस्त्वधर्मेण द्रव्याणि प्रतिपादयति ज्येष्ठोऽपि तमभागं कुर्वीत ।।
– दायभाग (५.१) मध्ये उल्लेखित. आपस्तम्ब

१६. सवर्णजोऽप्य गुणवान्नार्ह: स्यात् पैतृके धने तत् पिण्डदा: श्रोत्रिया ये तेषां तदभिधीयते । – दायभाग (५.४) मध्ये उल्लेखित

१७. एतेषां विभागात्प्रागेव दोषप्राप्तावनंशत्वमुपपन्नं न पुनर्विभक्तस्य । विभागोत्तरकालमप्यौषधादिना दोषनिर्हरणे भागप्राप्तिरस्त्येव विभक्तेषु सुतो जात: सवर्णायां विभागभाक् इत्यस्य समानन्यायत्वात् ।
– याज्ञवल्क्य (२.१४०) वरील मिताक्षरा टीका

१८. 'अतीतव्यवहारान् ग्रासाच्छादनै: बिभृयु: अन्धजडक्लीबव्यसनि व्याधितादींश्च अकर्मिण: पतिततज्जातवर्जम्' – दायभाग ५.१२

१९. औरसा: क्षेत्रजास्त्वेषां निर्दोषा भागहारिण: ।
सुताश्चैषां प्रभर्तव्या यावद्वै भर्तृसात्कृता ।।
– याज्ञवल्क्य (२.१४१) जीमूतवाहनद्वारा दायभाग (५.१९) मध्ये उल्लेखित



## प्रकरण सहावे

# स्त्रीधन

'स्त्रीधन' हा विषय अगदी वेदिक साहित्याच्या कालापासून हाताळलेला आहे, असे दिसते. रोमनांच्या पूर्वीपासून हिंदूंमध्ये याविषयीची ओळख असल्याचा उल्लेख Sir Henry Mayne करतात. तर स्त्रीचे स्त्रीधनावरील अधिकार सर्वप्रथम हिंदूंनीच ओळखले, असा दावा Sir Banerjee करतात.[१]

प्राचीन साहित्यातही ज्याचा उल्लेख आढळतो, अशा 'स्त्रीधन' या विषयांतर्गत ३ मुद्यांवर विचार केला जातो.

१) स्त्रीधनाचे स्वरूप २) स्त्रीधनावरील स्त्रीचा हक्क ३) स्त्रीधनाचे विभाजन

या प्रत्येकच मुद्याचे बाबतीत फार मोठ्या प्रमाणात मतभिन्नता आढळते आणि त्यामुळे हा विषय फारच गहन झालेला आहे. जीमूतवाहन तर तसा स्पष्टच उल्लेख करतात.[२]

## स्त्रीधनाचे स्वरूप

'स्त्रीधन' या शब्दाचा अर्थ 'स्त्रीचे धन' असा होतो. धर्मशास्त्रग्रंथांमध्ये आढळणारी स्त्रीधनाची सर्वात जुनी व्याख्या मनुची होय.

'स्त्रीधन' प्रकरणात जीमूतवाहनही मनुची व्याख्या उद्धृत करतात.[३] ''वैवाहिक अग्नीसमक्ष दिलेले, पतिगृही जाताना मिळालेले, प्रेमाखातर कुणी दिलेले, आणि आई, वडील व भाऊ यांनी दिलेले धन असे षड्विध स्त्रीधन सांगणाऱ्या नारदवचनाचाही त्यांनी समावेश केला आहे, ज्यात मनुप्रमाणे 'दत्तं च प्रीतिकर्मणि' या प्रकाराऐवजी 'भर्तृदाय' (पतीकडून भेटीदाखल मिळालेले) असा शब्दप्रयोग ते करतात.

याज्ञवल्क्य[४] स्त्रीधनाविषयी सांगतात, 'पिता, माता, पती आणि भाऊ यांनी दिलेले, वैवाहिक अग्नीसमोर मिळालेले, पतीने दुसरा विवाह केला असता प्रथम पत्नीला मिळणारे (आधिवेदनिक) जे धन ते सर्व 'स्त्रीधन' म्हणविते. याशिवाय जवळच्या नातेवाईकांकडून स्त्रीला मिळालेले, शुल्कस्वरूपातील धन, विवाहा-नंतर भेटीदाखल मिळालेले ते सर्व स्त्रीधनच होय.

व्याख्येतील 'आद्य' या शब्दाद्वारे वारसाहक्काने प्राप्त झालेली, क्रयादींद्वारा मिळविलेली, विभागाद्वारे प्राप्त झालेली, परिग्रह आणि अधिगम याद्वारे मिळालेल्या संपत्तीचाही स्त्रीधनात अंतर्भाव होतो, असे सांगून विज्ञानेश्वरांनी स्त्रीधनाचे क्षेत्र व्यापक केले आहे.

याउलट, जीमूतवाहनांनी दायभागात स्त्रीधनाचा मर्यादित अर्थ दिलेल आहे. मिताक्षरेप्रमाणे 'आधिवेदनिकाद्यं च' असा प्रयोग न करता 'आधिवेदनिकं चैव' असा ते प्रयोग करतात. एक देवलवचन[५] यासंबंधात उद्धृत करून त्याद्वारे जीमूतवाहन सांगतात की, 'उदरनिर्वाह आणि वस्त्रादींसाठी मिळालेल्या धनातून उरलेले, स्त्रीचे अलंकार, ऋणादींवरील व्याज, शुल्क धन ही सर्व स्त्रीची संपत्ती होय. आणि तिच्या पतीला त्या धनाचा व्यय करण्याचा आपत्कालाव्यतिरिक्त अधिकार नसतो.'

थोडक्यात, दायभागानुसार – पतीने स्थावर इस्टेट, जी भेट म्हणून दिलेली आहे, वैवाहिक अग्नीसमोर इतर व्यक्तींनी भेटीदाखल दिलेल्या वस्तू आणि भर्तृगृही जाताना प्राप्त झालेल्या वस्तू हे सर्व सोडून इतर सर्व भेटीदाखल मिळालेल्या वस्तू 'स्त्रीधन' म्हणवितात.

अशाप्रकारे जीमूतवाहन आणि विज्ञानेश्वर यांनी सांगितलेले 'स्त्रीधन' आपण पाहिले. दोघांनीही अध्यग्नि, अध्यावहनिक, प्रीतिदत्त, शुल्क, अन्वाधेय व सौदायिक असे स्त्रीधनाचे प्रकार सांगितले आहेत.

## स्त्रीधनावरील स्त्रीचा अधिकार

स्त्रीधनावर असणारा स्त्रीचा अधिकार हा ते धन कशाप्रकारे मिळविले आहे आणि ते धन कोणत्या अवस्थेत असताना (विवाहित, अविवाहित, विधवा) प्राप्त झाले आहे, या दोन गोष्टींवर मुख्यत: अवलंबून असते.

जीमूतवाहन कात्यायनांचे वचन उद्धृत करून सांगतात की, **'सौदायिक'** नामक स्त्रीधनावर स्त्रीचा स्वतंत्र हक्क असतो. कारण त्या स्त्रियांना अतिशय वाईट परिस्थितीला तोंड द्यावे लागू नये म्हणून तिच्या नातेवाईकांनी आधार म्हणून अथवा उदरनिर्वाहासाठी म्हणून ते धन दिलेले असते. या धनाचा दानविक्रया-दींमध्ये विनियोग करण्याचे बाबतीत त्या स्त्रिया स्वतंत्र असतात. ते सौदायिक धन स्थावर इस्टेटीच्या स्वरूपात असले तरीही त्यावर स्त्रीचाच हक्क असतो.[६]

स्त्रीला तिच्या पतीने प्रीतिखातर जे कांही दिले असेल, त्याचा पतीचे निधन झाल्यावर सुद्धा तिला हवा तसा विनियोग ती करू शकते. परंतु त्यापैकी असलेली स्थावर इस्टेट सोडून.

कात्यायन वचना[७]वरून जीमूतवाहन सांगतात की, 'भर्तृदाय धन' - जे पतीने त्याच्या जीवितकाली पत्नीला दिलेले आहे, ते पतीच्या जीवितकाली काळजीपूर्वक जतन करावे अथवा कुटुंबासाठी खर्च करावे.

स्त्रीला उदरनिर्वाह, वस्त्राभरणे यासाठी मिळालेल्या धनातून उरलेले, तिचे अलंकार, शुल्कधन, तिचे ऋणादींवरील व्याज यावर फक्त स्त्रीचाच हक्क असतो. आपत्कालाव्यतिरिक्त इतर वेळी पतीला त्या धनाचा व्यय करण्याचा अधिकार नसतो. हा आपत्काल कोणता? तर[८] ''पतीला दुर्भिक्षादि संकटांना तोंड द्यावे लागत असेल, आणि स्त्रीधनाव्यतिरिक्त उदरनिर्वाहासाठी अन्य मार्ग नसेल तर तो त्याच्या पत्नीचे स्त्रीधन घेऊ शकतो, असे जीमूतवाहन सांगतात.

याविषयी याज्ञवल्क्य सांगतात - 'दुर्भिक्षादि संकटांचे वेळी, धार्मिक कार्यासाठी, पती व्याधिग्रस्त झाला असता, तो कांही कारणाने बंदिवान झाला असता, पतीने पत्नीचे स्त्रीधन घेतल्यास ते परत करायास तो बांधलेला नसतो.'

याचा अपवाद जीमूतवाहन सांगतात की, हस्तकलादिद्वारा मिळविलेले धन आणि परक्या व्यक्तीकडून भेटीदाखल मिळविलेल्या स्त्रीधनावर आपत्काला-व्यतिरिक्त सुद्धा पतीचा हक्क असतो. हा अपवाद मिताक्षरा सांगत नाही.

स्त्रीधनाच्या कांही भागावरच पतीचा आपत्कालाव्यतिरिक्तही हक्क असतो, परंतु हा अपवाद सोडला तर पुत्र, पिता, भाऊ यापैकी कुणालाच स्त्रीधन ग्रहण करणे वा त्याचा विनियोग करायाचा अधिकार नसतो. जर विनियोग केला तर त्याला धन सव्याज परत करावे लागते व दंडही द्यावा लागतो. स्त्रीची संमती घेऊन त्या धनाचा उपभोग घेतल्यास फक्त घेतलेली मूळ रक्कम परत करावी लागते.[९]

मिताक्षरा सुद्धा मनुवचनाच्या आधारे 'स्त्रीचे धन तिचे बांधव हरण करीत असतील तर राजाने त्यांना चौरदंडाद्वारे शिक्षा करावी असे दंडविधान करते.[१०] तसेच पती जीवित असताना स्त्रीने धारण केलेल्या अलंकारांवर दायादांचा अधिकार नसतो. त्यांचा उपभोग घेण्याचा प्रयत्न करणारे पतित होतात असेही

मिताक्षरा सांगते.

अशा रीतीने स्त्रीधनावरील स्त्रीच्या अधिकाराविषयी विज्ञानेश्वर व जीमूतवाहन यांची मते आपण पाहिली.

## स्त्रीधनावरील वारसाहक्क

स्त्रीधनावर असणारा वारसाहक्क हा – ती स्त्री विवाहित आहे अथवा अविवाहित आहे, विवाहित असल्यास मान्यता पावलेल्या विवाहप्रकाराने विवाहबद्ध झालेली आहे अथवा नाही आणि त्या स्त्रीधनाचा प्रकार – यावर अवलंबून असतो.

या विषयावरील सर्वात जुनी वचने गौतम आणि मनु इत्यादींची मानली जातात. मिताक्षरा आणि जीमूतवाहन या दोघांनीही ही गौतम[११]–मनु[१२] वचने उद्धृत केली आहेत, ज्याद्वारे गौतम सांगतात की, 'स्त्रीधन प्रथम मुलीकडे जाते, मुलींपैकी ज्या अविवाहित आहेत त्यांच्याकडे प्रथम जाते आणि विवाहित मुलींमध्ये ज्या गरजू असतील, त्यांना हे धन प्रथम मिळते.

तर मनु सांगतो की, मातेचे निधन झाल्यावर सर्व सहोदर भाऊ–बहिणींनी तिचे धन विभागून द्यावे. तसेच त्या मुलांच्या मुलींना सुद्धा मातामहीच्या धनातून काही धन प्रीतिखातर द्यावे.

विज्ञानेश्वर आणि जीमूतवाहन दोघांनीही पुत्र व कन्या यांचा मातृधनावरील **तुल्याधिकारच** सांगितला आहे.

याज्ञवल्क्य कन्यांचा मातृधनावरील अधिकार सांगून विवाहाच्या प्रकारानुसार स्त्रीधनावरील वारसाहक्क सांगतात की,[१३] ''स्त्रीधन हे कन्यांकडे जाते. परंतु ती स्त्री अपत्य न होताच मरण पावली तर ती ब्राह्म, दैव, आर्ष वा प्राजापत्य यांपैकी एखाद्या प्रकाराने विवाहबद्ध झाली असेल तर, ते धन पतीकडे जाते.''

विवाहप्रकाराचा उल्लेख करून त्यानुसार सांगितलेला वारसाहक्क जीमूतवाहनांना मान्य नाही. त्यांच्या मते हे याज्ञवल्क्य वचन **वैवाहिक धनाबद्दलचे** आहे.

विवाहकाली प्राप्त झालेल्या धनाबद्दलचा वारसाक्रम जीमूतवाहन सांगतात तो असा – सर्वप्रथम कुमारी कन्या – त्याअभावी वाग्दत्त कन्या – त्याअभावी विवाहित कन्या – आणि या सर्व कन्यांअभावी पुत्र आणि स्त्री अपत्यहीन

असल्यास ते धन पतीकडे जाते.[१४]

स्त्रीधनाचे वारस ठरविताना स्मृतिवचनांना आधार मानून विज्ञानेश्वर आणि जीमूतवाहन दोघेही पुत्रांपेक्षा कन्यांना प्राधान्य देतात.

मिताक्षरा स्त्रीधनाचे बाबतीत २ प्रकारचा वारसाक्रम मानते -

१) शुल्क धनविषयक

२) इतर सर्व प्रकारच्या स्त्रीधनाचे बाबतीत.

१) मिताक्षरा सांगते - **'शुल्कधन'** हे प्रथम सोदर भावांकडे व नंतर मातेकडे जाते.

२) अविवाहित कन्येच्या धनाचा असा क्रम बौधायनवचनाद्वारे मिताक्षरा सांगते - 'मृत अविवाहित कन्येचे धन प्रथम तिच्या सोदर भावांकडे त्यानंतर माता व तिच्यानंतर पित्याकडे जाते.

३) वाग्दत्त कन्या विवाहसंस्कार होण्यापूर्वीच मरण पावली तर तिचे **शुल्कधन** - त्यातून पिता आणि तिचा नियोजित वर यांना जो खर्च आला असेल, त्याचा व्यय करून उरलेले धन वराला द्यावे. या कन्येला मातामहादींनी शिरोभूषणादि अलंकार दिले असतील तर ते सोदर भाऊ ग्रहण करतात.

स्त्रीचे शुल्कधन आणि अविवाहित कन्येचे धन **याव्यतिरिक्त धनाचा** वारसाक्रम मिताक्षरा सांगते -

१) अविवाहित कन्या २) विवाहित कन्या - जी निर्धन अथवा गरजू आहे, ३) सधन विवाहित कन्या, ४) मुलींच्या मुली, ५) मुलींची मुले, ६) पुत्र, ७) पुत्राचे पुत्र, ८) पती (मान्यता पावलेल्या ब्राह्मादि प्रकारांनी विवाहबद्ध झाली असता), ९) पतीचे सपिंड - सान्निध्यानुसार या सपिंडांचा क्रम लागतो.

या सपिंडांच्या अभावी त्या कन्येची माता, नंतर तिचा पिता आणि त्यानंतर पित्याचे सपिंड धनग्राही ठरतात.

कन्याही मान्यता न पावलेल्या एखाद्या विवाहप्रकाराने विवाहबद्ध झाली असता तिच्या वारसाच्या अभावी तिचे माता-पिता - पित्याचे सपिंड - त्यांच्या अभावी तिचा पती - राजाकडे जाण्यापूर्वी पतीचे सपिंड हे वारस क्रमशः ठरतात.

**केवळ पुत्र आणि पौत्रच असणारी** एखादी स्त्री, स्त्रीधन मागे ठेवून मरण पावली तर पुत्र हा पौत्राचा बाध करून मातेचे स्त्रीधन घेतो.

तसेच स्त्रीला मुली आणि मुलींच्या मुली दोघीही असताना नातींनाही काही धन प्रीतिखातर द्यावे, असे मिताक्षरा मनुवचनाच्या आधारे सांगते.

अनपत्य परंतु हीनजातीची स्त्री मरण पावल्यास उत्तम जातीच्या सपत्नीची कन्या धनग्रहण करते व तिच्या अभावी त्या मुलीचा पुत्र वारस ठरतो, असे मिताक्षरा सांगते.

अशाप्रकारे सर्व प्रकारच्या स्त्रीधनाचा मिताक्षरेने सांगितलेला वारसाक्रम आपण पाहिला.

आता जीमूतवाहनांनी सांगितलेला वारसाक्रम बघू –

**शुल्करूप** स्त्रीधन हे स्त्रीला सर्वच विवाहप्रकारात प्राप्त होत असते. त्याचा दायभागानुसार वारसाक्रम असा आहे – १) सोदर भाऊ २) माता ३) पिता ४) पती.

यौतक अथवा परिणयनलब्ध नामक स्त्रीधनाचा वारसाक्रम जीमूतवाहन असा सांगतात –

स्त्रीला पुत्र आणि कन्या दोघेही असताना यौतक स्त्रीधन हे पुत्रांकडे न जाता तिच्या कन्या ते धन घेतात.

मनु[१५] आणि वसिष्ठ यांच्या वचनांवरून यौतक धनावर कन्यांचाच प्राथमिक अधिकार असल्याचे जीमूतवाहन सांगतात.

विवाहित मुलींमध्ये ज्या पुत्रवती असतील अथवा पुत्रवती होणार असतील अशा मुलींना जीमूतवाहन वारस म्हणून प्राधान्य देतात. कारण पुत्रवती कन्यांकडे धन गेल्यास त्या कन्या त्यांच्या पुत्राद्वारे पार्वण श्राद्धाचे वेळी पिंडदान करणाऱ्या असतात.[१६]

दौहित्राचा अधिकारही **'उपकारकत्व'** तत्त्वावरच आधारित असल्याचे जीमूतवाहन म्हणतात आणि याच तत्त्वाच्या आधारे मुलांच्या मुलांचा अधिकार प्रथम न सांगता मुलींच्या मुलांचा – दौहित्राच्या अधिकाराला प्राधान्य देतात कारण मुलाच्या मुलाप्रमाणेच मुलीचा मुलगाही त्याच्या मातामहाच्या दृष्टीने तेवढाच महत्त्वपूर्ण असतो, असे मनुवचनाद्वारे कळते.[१७]

याच कारणास्तव पार्वणश्राद्धाचे वेळी आपल्या पुत्रांद्वारे पिंडदान करण्यास समर्थ असणाऱ्या पुत्रवती विवाहित मुलींना विधवा आणि पुत्र नसलेल्या मुलींपेक्षा

वारस म्हणून जीमूतवाहन प्राधान्य देतात.

यावरून जीमूतवाहनांनी सांगितलेला यौतकधनाचा वारसाक्रम असा आहे–

१) अविवाहित मुली आणि अवाग्दत्त मुली २) वाग्दत्त मुली ३) विवाहित मुली – ज्यांना पुत्र आहे अथवा होण्याचा संभव आहे ४) पुत्रहीन विवाहित मुली आणि विधवा मुली ५) पुत्र ६) दौहित्र ७) पौत्र ८) प्रपौत्र ९) सापत्न पुत्र १०) सापत्न पौत्र ११) सापत्न प्रपौत्र.

मृत स्त्रीचा विवाह मान्यता पावलेल्या विवाहप्रकाराने झाला असता तिचे यौतक धन – पती – भाऊ – माता – पिता अशा क्रमाने वारसांकडे जाते आणि ती स्त्री जर मान्यता न पावलेल्या असुरादि प्रकारांनी विवाहबद्ध झाली असली तर तिचे यौतक धन माता – पिता – भाऊ आणि पती – या क्रमाने वारसांकडे जाते.

यानंतर जीमूतवाहनांनी दायभागात सांगितलेल्या 'अन्वाधेय' नामक (विवाहानंतर पित्याच्या कुटुंबियांकडून भेटीदाखल मिळालेल्या) स्त्रीधनाचा वारसाक्रम पाहू –

या स्त्रीधनाचा वारसाक्रम जवळजवळ यौतकधनाप्रमाणे असतो. काही बाबतीत फरक आहे. तो असा –

यौतक धन हे प्रथम विवाहित नंतर अविवाहित कन्या घेतात. त्यांच्या अभावी ते धन पुत्रांकडे जाते. परंतु अन्वाधेय हे स्त्रीधन अविवाहित आणि अवाग्दत्ता कन्या यांच्या वाग्दत्ता कन्या घेतात व त्यांचाही अभाव असल्यास विवाहित कन्यांकडे ते धन न जाता पुत्रांकडे जाते. हा क्रम अपत्यवती स्त्रीविषयक आहे.

परंतु स्त्री अपत्य न होताच मरण पावली तर तिचे 'अन्वाधेय' धन तिच्या बांधवांकडे जाते. सर्वप्रथम तिचा भाऊ – त्याअभावी माता – नंतर पिता व या सर्वांच्या अभावी तिचा पती ते धन घेतो.

जीमूतवाहनांनी सांगितलेला 'अयौतक' धनाचा वारसाक्रम असा –

१) पुत्र आणि कुमारी कन्या एकाचवेळी धनाधिकारी ठरतात २) विवाहित कन्या – जिला पुत्र आहे अथवा पुत्र होण्याची शक्यता आहे ३) पौत्र ४) दौहित्र ५) पुत्र होण्याची शक्यता नसलेल्या विवाहित मुली आणि पुत्र नसलेल्या विधवा मुली.

उपर्युक्त वारसांच्या अभावी मृत स्त्रीचे ‘अयौतक’ धन १) भाऊ २) माता ३) पिता ४) पती या वारसांकडे जाते.

यापैकीही कोणीच वारस नसल्यास स्त्रीचे यौतक आणि अयौतक धन १) पतीचा लहान भाऊ २) पतीच्या भावाचा पुत्र ३) बहिणीचा पुत्र ४) पतीच्या बहिणीचा पुत्र ५) भावाचा पुत्र ६) कन्येचा पती या वारसांकडे जाते.

आणि या ६ वारसांचे अभावी पतीचे सपिंड, सकुल्य आणि समानोदक धन घेतात व त्यानंतर पित्याचे नातेवाईक धनग्राही ठरतात.

जीमूतवाहनांनी सांगितलेला वरील वारसाक्रम पाहिल्यास यौतक किंवा अयौतक धनाचा सर्वप्रथम वारस हा पतीचा लहान भाऊ मानला आहे कारण तो त्याची वहिनी, भाऊ आणि अशा ३ व्यक्तींना पिंडदान करतो, ज्या तिघांना भाऊ जीवित असता, त्याने पिंडदान केले असते. अर्थातच पतीच्या भावाला सपिंड म्हटले आहे.

त्यानंतर पतीच्या ज्येष्ठ अथवा कनिष्ठ भावाचा पुत्र धनग्रहण करतो. हाही सपिंड असून मृत स्त्री म्हणजे त्याची काकू, तिचा पती व अशा २ व्यक्तींना पिंडदान करतो, ज्यांना त्याच्या काकाने पिंडदान केले असते.

त्याच्या अभावी बहिणीचा पुत्र वारस ठरतो. हा जरी सपिंड नसला तरी (त्याच्या मावशीला) आणि तिच्या पुत्राने ज्या ३ व्यक्तींना (तिचे वडील इ.) पिंडदान केले असते, त्यांना पिंड अर्पण करतो.

याप्रमाणेच मृत स्त्रीच्या पतीच्या बहिणीचा पुत्र, मृत स्त्रीच्या भावाचा पुत्र आणि त्याअभावी तिच्या कन्येचा पती या सर्व पिंडदान करणाऱ्यांना वारसाहक्क मिळतो.

उपर्युक्त वारसाक्रम पाहिल्यास जीमूतवाहनांनी तो ठरविताना उपकारकत्वाला प्राधान्य दिलेले दिसते.

उपर्युक्त ६ वारसांचे अभावी श्वशुर, पतीचा सर्वात ज्येष्ठ भाऊ इ. व्यक्ती सामीप्यानुसार वारस ठरतात.

कुमारी कन्या मरण पावल्यास मिताक्षरा व दायभाग तिच्या धनाचा वारसाक्रम सांगतात – १) सोदर भाऊ २) माता व तिच्या अभावी ३) पिता.

या सर्व अभ्यासावरून हे लक्षात येते की, मिताक्षरा स्त्रीधनाच्या जितक्या

जास्त प्रकारांवर स्त्रीचे स्वत्व असल्याचे सांगते, तितक्या प्रकारांवर स्त्रीचे स्वत्व असल्याचे जीमूतवाहन सांगत नाहीत.

असे असूनही जीमूतवाहनानांनी स्त्रियांना जो लाभ प्राप्त करून दिला आहे, तो मिताक्षरेने दिलेला नाही. कारण मिताक्षरेच्या तत्त्वांनुसार एखाद्या व्यक्तीचा वाडवडिलार्जित संपत्तीवरील हक्क त्याच्या मृत्युनंतर ती व्यक्ती मागे राहिल्याने (Survivorship मुळे) दुसऱ्या व्यक्तीकडे जातो. तर दायभागानुसार उत्तराधिकारामुळे (Succession) हा हक्क प्रस्थापित होतो. याचा परिणाम असा झाला आहे की, मिताक्षरेनुसार इतर कुठलाही वारस जीवित असताना विधवा पत्नी, कन्या, माता इ. वडिलार्जित संपत्तीच्या वारस ठरू शकत नाहीत. तर दायभागानुसार इतर वारसांच्या जीवितामुळे विधवा पत्नी इ.च्या वारसाहक्काला बाधा येऊ शकत नाही.

अशा रीतीने विज्ञानेश्वर आणि जीमूतवाहन यांच्या 'स्त्रीधन' या विषयावरील मतांमध्ये असलेला फरक आपण पाहिला.

## संदर्भसूची

१. 'Nowhere were proprietory rights of women recognised so early as in India, and in very few ancient systems of law have these rights been so largely conceded as in our own.' - 'Marriage and Stridhana'- by Sir Goorodas Banerjee, P. 370

२. इत्यतिगहनमुक्तमप्रज: स्त्रीधनम्। – दायभाग ४.३.४२

३. अध्यग्नि अध्यावह्निकं दत्तं च प्रीतिकर्मणि।
भ्रातृमातृपितृप्राप्तं षड्विधं स्त्रीधनं स्मृतम्।। – मनुस्मृती ९.१९४

४. पितृमातृपतिभ्रातृदत्तमध्यग्न्युपागतम्।
आधिवेदनिकाद्यं स्त्रीधनं परिकीर्तितम्।। – याज्ञवल्क्य स्मृती २.१४३

५. वृत्तिराभरणं शुल्कं लाभश्च स्त्रीधनं भवेत्।
भोक्ती तत् स्वयमेवेदं पतिर्नार्हत्यनापदि। – देवल
– जीमूतवाहनद्वारा दायभाग (४.१.१५) मध्ये उल्लेखित

६. सौदायिकं धनं प्राप्य स्त्रीणां स्वातन्त्र्यमिष्यते।

यस्मात्तदानृशंस्यार्थं तैर्दत्तं तत्प्रजीवनम्।
सौदायिके सदा स्त्रीणां स्वातन्त्र्यं परिकीर्तितम्।
विक्रये चैव दाने च यथेष्टे स्थावरेष्वपि। – कात्यायन

– दायभाग ४.१.२२–२४ मध्ये उल्लेखित

७. भर्तृदायं मृते पत्यौ विन्यसेत् स्त्री यथेष्टत:।
विद्यमाने तु संरक्षेत् क्षपयेत्कुलेऽन्यथा। – कात्यायन
– दायभाग ४.१.८ मध्ये उल्लेखित

८. भर्ता तु यदि दुर्भिक्षादौ स्त्रीधनं विना वर्तनाक्षमस्तदा ग्रहीतुमर्हति नान्यथा। यदाह याज्ञवल्क्य, दुर्भिक्षे धर्मकार्ये च व्याधौ सम्प्रतिरोधके। गृहीतं स्त्रीधनं भर्ता न स्त्रियै दातुमर्हति। – दायभाग ४.१.२४

९. न भर्ता नैव च सुतो न पिता न भ्रातरो न च। आदाने वा विसर्गे वा स्त्रीधने प्रभविष्णव:। यदि ह्येकतरस्त्वेषां स्त्रीधनं भक्षयेद्बलात्। स वृद्धिं प्रतिदाप्य: स्याद्दण्डश्चैव समाप्नुयात्। तदेव यद्यनुज्ञाप्य भक्षयेत् प्रीतिपूर्वकम्। मूलमेव तदा दाप्यो यदा स धनवान् भवेत्। – कात्यायन – दायभाग ४.१.२४

१०. जीवन्तीनां तासां ये तद्धरेयु: स्वबान्धवा:।
तान् शिष्याच्चौरदण्डेन धार्मिक: पृथिवीपति:।। – मनु ८.२९

११. स्त्रीधनं दुहितॄणामप्रत्तानामप्रतिष्ठितानाञ्च। – गौतम २८.२२
– याज्ञवल्क्य स्मृती (२.१४५) वरील मिताक्षरा टीकेत उल्लेखित, दायभाग (४.२.२२) मध्ये उल्लेखित

१२. जनन्यां संस्थितायां तु सर्वे सहोदरा:। समं भजेरन् मातृकं रिक्थं भगिन्यश्च सनाभय:। – मनु ९.१९२
– याज्ञवल्क्य स्मृती (२.१४५) वरील मिताक्षरा टीकेत उल्लेखित, दायभाग (४.२.१) मध्ये उल्लेखित

१३. अतीतायामप्रजसि बान्धवास्तदवाप्नुयु:। अप्रज: स्त्रीधनं भर्तु: ब्राह्मादिषु चतुर्ष्वपि। दुहितॄणां प्रसूता चेत् शेषेषु पितृगामि तत्। – याज्ञवल्क्य स्मृती २.११४–११५

१४. अप्रजः स्त्रीधनं भर्तुः पितृगामि तत्। ब्राह्मादिषु विवाहेषु यल्लब्धमध्यग्निधनं स्त्रियाः तत्तस्यां मृतायां प्रथमं दुहितॄणामेव तत्रापि प्रथमं कन्यायास्तदभावे प्रत्तायास्तदभावे परिणीतायाः सर्वदुहित्रभावे च पुत्रस्याधिकारः, अप्रजः स्त्रीधने भर्तुरधिकारात्। – दायभाग ४.२.२४–२५

१५. मातुश्च यौतकं यत्स्यात् कुमारीभाग एव सः। – मनु ९.१३१
मातु परिणाय्यं स्त्रियो विभजेरन्। – वसिष्ठ १७.४०
– दायभाग (४.२.१३–१४) मध्ये उल्लेखित

१६. ... ऊढायाः दुहितुः पुत्रवत्याः सम्भावितपुत्रायाश्च तुल्योऽधिकारः स्वपुत्रद्वारेण पार्वणपिण्डदानसम्भवात्। – दायभाग ४.२.९

१७. दौहित्रोऽपि ह्यमुत्रैनं सन्तारयति पौत्रवत्। – मनु ९.१३९
– दायभाग (४.२.१०) मध्ये उल्लेखित



## प्रकरण सातवे

# अपुत्रधन–विभाग

पित्याच्या धनाचे एकमेव वारस औरस पुत्र असतात, हे सर्वमान्यच आहे. परंतु औरस अथवा गौणपुत्र नसताना त्या व्यक्तीची संपत्ती कोणत्या वारसांकडे जाते, याविषयी विज्ञानेश्वर आणि जीमूतवाहन यांची मते आता आपण बघू –

**याज्ञवल्क्य** आणि **विष्णु** हे सर्वच स्मृतिकारांमध्ये 'निपुत्रिकाच्या धनावर सर्वप्रथम त्याच्या पत्नीचा अधिकार असतो,' असा स्पष्टपणे नियम सांगणारे पहिलेच स्मृतिकार मानले जातात.

निपुत्रिकाच्या धनावरील सर्वप्रथम अधिकार पत्नीचा मानणारे विष्णुवचन मिताक्षरा[१] व जीमूतवाहन उद्धृत करतात.

जीमूतवाहन एका[२] बृहस्पतिवचनाद्वारे सांगतात की, 'वेद, स्मृती आणि मान्यताप्राप्त चालीरीती याद्वारे पत्नीला पतीची अर्धांगिनी मानले आहे. तेव्हा ज्याची पत्नी जीवित आहे, त्या मृत व्यक्तीचा देहार्ध पत्नीरूपात प्रत्यक्षत: जीवित असतो. मग त्या मृत व्यक्तीचे धन पत्नीशिवाय इतर व्यक्तीकडे कसे जाईल ?

पत्नीशिवाय इतरांचा अधिकार सांगणाऱ्या विष्णु इ. स्मृतिकारांच्या वचनांतील विरोधाचा परिहार करून निपुत्रिक मृताची सर्व संपत्ती त्याच्या पत्नीकडे जाते, असे जीमूतवाहन प्रस्थापित करतात.

मिताक्षराही सर्वप्रथम पत्नीचाच अधिकार सांगते. परंतु ती पत्नी कशी असावी ? तर ती पत्नी 'संयतेंद्रिया' असावी, असे मिताक्षरा स्पष्टच सांगते. 'पत्नी दुहितरश्च' या वचनात याज्ञवल्क्यांनी 'पत्नी' हा शब्दप्रयोग केला असल्याने त्यातून विवाहित व सदाचरणी पत्नी पतीचे धन घेते हेच सूचित होते. पत्नी म्हणजे कोण ? तर मिताक्षरा सांगते,[३] विवाहाने संस्कृत झालेली – तीच धन घेण्यास पात्र असते. 'पत्नी' हा शब्द 'पती' या शब्दाला 'यज्ञक्रियांमध्ये पतीला सहभाग देण्यास समर्थ असणारी' या अर्थाचा प्रत्यय लावून तयार झाला आहे.

म्हणूनच विभक्त झालेला आणि पुन: संसृष्ट झालेला पुत्रहीन पुरुष मरण पावल्यास त्याचे धन प्रथम त्याची पत्नी घेते. तिच्या अभावी इतर वारसांकडे धन

जाते.

मृत निपुत्रिकाच्या धनावरील वारसाहक्क सांगणारे जे शंखवचन 'अपुत्रस्य स्वर्यातस्य ..... पत्नी वा ज्येष्ठा' यातील 'ज्येष्ठा पत्नी' याचे विज्ञानेश्वर असे स्पष्टीकरण देतात की, ज्येष्ठा म्हणजे गुणांनी ज्येष्ठ असलेली पत्नी पतीचे सर्व धन घेते.

शंखवचनातील या 'ज्येष्ठापत्नी'चे स्पष्टीकरण जीमूतवाहन अगदी वेगळ्या प्रकारे देतात. उत्तमवर्णाची जी पत्नी, ती ज्येष्ठ मानली जावी. कारण मनु[४]ही तसेच सांगतो - स्वत:च्या वर्णाची आणि इतर वर्णाची अशा २ भार्या केल्या असल्यास त्या भार्यांचे ज्येष्ठत्व आदर आणि राहण्याची व्यवस्था त्यांच्या वर्णक्रमानुसार केली जावी.

अशा रीतीने पत्नीचे ज्येष्ठत्व वर्णानुसार ठरविले जात असल्याने स्वत:च्या वर्णाची स्त्री विवाहाच्या तिथीचा विचार करता लहान असली तरी आधी विवाहबद्ध झालेल्या इतर वर्णाच्या पत्नीहून ती ज्येष्ठच मानली जाते.

अशा रीतीने वर्णक्रमानुसार पत्नीला धनग्रहणाधिकार प्राप्त होत असतो. पत्नीचा धनाधिकार सांगणाऱ्या वचनात कधी 'पत्नी' तर कधी 'स्त्री' असा शब्दप्रयोग आढळतो, तर जीमूतवाहन त्याचे समर्थन करतात की, 'पत्नी' या शब्दाचा 'विवाहिता सवर्ण स्त्री' असा अर्थ होतो. तर 'स्त्री' या शब्दाचा 'विवाहिता स्त्री' एवढाच अर्थ होतो. ती स्त्री सवर्ण असेल, असा विशेष अर्थ त्यातून प्रतीत होत नाही.

तात्पर्य, बृहस्पतीने पत्नी हा शब्दप्रयोग करून त्याद्वारे विवाहिता आणि सवर्ण स्त्रीला मृत निपुत्रिकाच्या संपूर्ण धनावर अधिकार असल्याचे सांगितले आहे. तर नारदांनी 'स्त्री' असा शब्दप्रयोग करून 'विवाहिता स्त्री' (ती सवर्ण असेल असा अर्थ यातून सूचित होत नाही) जीवित असूनही तिच्या पतीच्या धनावर राजाचा हक्क असतो. तिला फक्त उदरनिर्वाहापुरतेच धन मिळते, असे सांगितले आहे.

पत्नीच्या अधिकाराबाबतची सर्व परस्परविरोधी वचनांची संगती लावून त्या धनावरील पत्नीच्या अधिकाराबाबत विज्ञानेश्वर आणि जीमूतवाहन यांनी विवेचन केले आहे.

## मृत निपुत्रिक पतीच्या धनावरील पत्नीच्या अधिकाराविषयी

पतीच्या निधनानंतर त्याचे धन ग्रहण करण्याचा अधिकार सर्वप्रथम कुणाला असतो, याविषयीच्या परस्परविरोधी वचनांमध्ये सुसंगती लावून, ते त्याच्या पत्नीकडेच जावे असे **विज्ञानेश्वर** आणि **जीमूतवाहन** सांगतात.

दोघांनीही 'पतीला यज्ञक्रियेत सहयोग देणाऱ्या स्त्रीलाच' पत्नीत्व प्राप्त होत असल्याचे सांगितले आहे व ते युक्त वाटते, कारण ज्या कालात हे कायदेग्रंथ लिहिले गेलेत, त्या कालात जी स्त्री विवाहबद्ध झाली आहे, तिने 'पतीला यज्ञक्रियांमध्ये सहकार्य देणे' हे अतिशय महत्त्वाचे मानले जाई आणि तिलाच पत्नीपद भूषविण्याचा मान असे.

अशा पत्नीला पतीची संपत्ती मिळाल्यावर महाभारतातील 'दानधर्म' प्रकरणातील एका वचनाच्या आधारे, **जीमूतवाहन** सांगतात की, 'पत्नीला या धनाचा उपयोग घेण्याची मुभा असते पण तो उपभोग सूक्ष्मवस्त्रपरिधानादि स्वरूपात नसावा तर देहधारणोचित उपभोगापुरताच त्या धनाचा व्यय करावा. तसेच पतीची और्ध्वदेहिक कर्मे पार पाडण्यासाठी दानादींमध्ये ती त्या धनाचा व्यय करू शकते.. 'नापहारं स्त्रिय: कुर्यु:' याद्वारे 'धनाच्या स्वामीला ज्याचा उपयोग नाही, त्यात तिने धनाचा व्यय करू नये' असा प्रतिबंधही घातला आहे. एका बृहस्पतीवचना'द्वारे 'पतीचे मासिक-षण्मासिक आणि इतर श्राद्धे तिने करावीत' असे जीमूतवाहन स्पष्ट सांगतात.

काही अपवादात्मक परिस्थितीत मात्र जसे तिला उदरनिर्वाहच करणे अशक्य झाले तर त्या धनाचे बाबतीत दानविक्रयादि अधिकार असल्याचेही सांगितले आहे.

एखाद्या निपुत्रिक व्यक्तीला एकापेक्षा जास्त स्त्रिया असतील तर त्यांनी पतीची सर्व संपत्ती समप्रमाणात घ्यावी असा उल्लेख विज्ञानेश्वर करतात. असवर्ण स्त्रीलाही पतीचे धन घेण्याचा अधिकार असल्याचे दोघेही सांगतात. पण सवर्ण स्त्रीचा अभाव असेल तेव्हाच, अन्यथा नाही. याचसंबंधी एक महत्त्वाचा विशेष म्हणजे ती पत्नी संयतेंद्रिया, पतीशी एकनिष्ठ असलेली असली तरच ती धनग्रहण करू शकते, अशीही मर्यादा सांगितली आहे.

मृत निपुत्रिक पतीच्या धनावरील पत्नीच्या अधिकाराविषयी विज्ञानेश्वर आणि जीमूतवाहन यांची मते सारखीच आहेत परंतु जीमूतवाहनांनी सांगितलेला पत्नीचा अधिकार उपकारकत्व या तत्त्वावरच आधारित असल्याचे स्पष्ट दिसते.

## पत्नीच्या अभावी कन्या

मृत निपुत्रिकाचे धन पत्नीच्या अभावी कन्या घेते, हे जीमूतवाहन आणि विज्ञानेश्वर दोघेही मानतात. 'पत्नी दुहितरश्च' या वचनाद्वारे याज्ञवल्क्यांनी हेच सांगितले आहे.

पत्नीच्या अभावी कन्या पित्याच्या धनाची अधिकारी होते याचे सकारण स्पष्टीकरण जीमूतवाहन आणि विज्ञानेश्वर एका बृहस्पतिवचनाच्या[६] आधारे देतात – 'पत्नीच्या अभावी तिची कन्या धन घेते कारण तीसुद्धा पुत्राप्रमाणेच मानवाच्या प्रत्येक अंगापासून उत्पन्न झालेली असल्याने ती असता दुसरे कुणी तिच्या पित्याचे धन घेण्यास कसे पात्र ठरेल ?

एका नारदवचनाद्वारे[७] जीमूतवाहन सांगतात की, पुत्राच्या अभावी कन्या धनग्रहण करणारी असते, कारण तीही पुत्राप्रमाणे वंशसातत्य टिकविणारी असते. नारदांनी **'तुल्यसंतानदर्शनात्'** याद्वारे कन्येच्या धनग्रहणाधिकाराचे कारण सांगितले आहे. तेच संतान होय, ज्याला पिंडदान करण्याचा अधिकार आहे. कन्येचा पुत्र हा मातामहाला पिंडदान करणारा असतो, म्हणून मृत निपुत्रिकाची कन्या ही पत्नीच्या अभावी धनग्रहण करते. जीमूतवाहन याही ठिकाणी उपकारकत्वाला प्राधान्य देतांना दिसतात.

पत्नीच्या अभावी कन्या धन घेते हे निश्चितच. पण त्यातील विशेष मिताक्षरा व जीमूतवाहन सांगतात की, 'कन्यांपैकी काही विवाहित आणि काही अविवाहित असतील तर प्रथम अविवाहित कन्या धनग्राहिणी ठरतात.

जीमूतवाहनांनी पितृधनाच्या वारसाहक्काविषयी सांगताना 'पिंडदानाद्वारे प्रदान केल्या जाणाऱ्या उपकारकत्वा'लाच प्राधान्य देऊन – 'जिला पुत्र आहे वा जी पुत्रवती होणार आहे अशी कन्या धन संपादन करते – कारण पुत्रवती कन्याच तिच्या पुत्राद्वारे उपकारकत्व प्रदान करीत असते. जी विधवा आहे, वन्ध्या आहे, जिला एकही पुत्र नाही, किंवा सर्व मुलीच आहेत, अशी कन्या धनग्रहणास पात्र

समजली जात नाही' हे ते एका दीक्षितवचनाच्या[८] आधारे सांगतात.

'सदृशी' आणि 'सदृशेनोढा' या विशेषणांद्वारे लेखकाला असे सुचवायचे आहे की, 'पित्याशी कन्येचे नाते असते', एवढ्याच कारणाने कन्या ही पित्याचे धन घेणारी ठरत नाही तर सवर्ण पुरुषाशी विवाहबद्ध झालेली कन्या ही तिच्या पुत्राद्वारे पित्याला उपकारक ठरते. (कारण जी कन्या तिच्यापेक्षा उच्च अथवा नीच वर्णाच्या पुरुषाशी विवाहबद्ध झालेली आहे, तिचा पुत्र त्याच्या मातामहाला पिंडदान करण्यास समर्थ नसतो.)

उपकारकत्वाला प्राधान्य देऊन वारसाक्रम सांगताना हेही नमूद करणे आवश्यक आहे की, वंशसातत्य राखण्यासाठी निपुत्रिक मनुष्य कन्येच्या पुत्राला आपला पुत्र मानतो. असा हा पुत्र 'पुत्रिकापुत्र' म्हणवितो. हा पुत्र मातामहाला पुत्राप्रमाणेच उपकारक ठरतो. त्याच्यामुळे त्याची माता ही पित्याच्या औरसपुत्राइतकेच महत्त्व प्राप्त करते. अर्थातच तिला व औरसपुत्राला समान वारसाहक्क असतो.

थोडक्यात, पत्नीच्या अभावी कन्या ही संपत्तीची वारस ठरते, जिच्या उपकारकत्वाचा आपण आत्ता विचार केला.

## कन्येच्या अभावी दौहित्र

विज्ञानेश्वर आणि जीमूतवाहन दोघेही कन्येच्या अभावी दौहित्राला वारस मानतात.

विज्ञानेश्वर आणि जीमूतवाहन एका विष्णू[९]वचनाद्वारे सांगतात की, 'एखाद्या व्यक्तीला पुत्र अथवा पौत्र नाहीत, अशी व्यक्ती मरण पावली तर तिचे धन कन्येच्या पुत्राकडे जाते. कारण पिंडदानाचे बाबतीत पौत्र व दौहित्र सारखेच मानले आहेत.'

याविषयी मनु सांगतो की, 'पुत्रिकाकरण झालेल्या अथवा न झालेल्या कन्येला सवर्ण पुरुषापासून पुत्र झाला तर त्या कन्येचा पिता कायद्याच्या दृष्टीने पुत्रवान मानला जातो. त्या पुत्राने त्याच्या मातामहाला पिंडदान करावे व त्याचे धनग्रहण करावे.'[१०]

उपर्युक्त मनुवचन जीमूतवाहन आणि विज्ञानेश्वर दोघांनीही उद्धृत केले आहे.

दौहित्र हा मातामहाला पिंडदान करीत असल्याने अर्थातच फार मोठे उपकारकत्व प्रदान करीत असतो. याच कारणामुळे त्याला कन्येच्या अभावी धनाधिकारी ठरविले आहे.

मिताक्षरा जीमूतवाहनाप्रमाणे वारसाहक्काच्या निश्चितीचे बाबतीत उपकारकत्वाला आधारभूत मानीत नसली तरी 'दौहित्राने मातामहाला पिंडदान करावे व त्याचे धनग्रहण करावे' असा निर्देश मनुवचनाद्वारे केल्याने विज्ञाने-श्वरांनीही काही प्रमाणात उपकारकत्व आधारभूत मानले आहे, असे म्हणता येईल.

वस्तुत: दौहित्र हा 'बंधु' मानला गेला आहे व तो 'भिन्नगोत्रसपिंड' आहे. परंतु श्राद्धाचे वेळी तो फार मोठ्या प्रमाणात उपकारकत्व प्रदान करीत असल्याने वारस या नात्याने त्याला फार वरचे स्थान प्राप्त झाले आहे.

## दौहित्राच्या अभावी माता-पिता

विज्ञानेश्वर आणि जीमूतवाहन दोघेही दौहित्राच्या अभावी माता-पिता मृताच्या धनाचे अधिकारी असल्याचे सांगतात. परंतु विज्ञानेश्वर प्रथम मातेचा तर जीमूतवाहन पित्याचा प्रथम अधिकार असल्याचे सांगतात.

दोघांमध्ये प्रथम मातेलाच कां वारस मानावे याचे कारण विज्ञानेश्वर देतात की, 'याज्ञवल्क्यांनी वारसाहक्क सांगणाऱ्या पंक्तीत माता-पित्यासाठी 'पितरौ' असा एक शेषद्वंद्वाचा प्रयोग केला आहे त्या समासाचा विग्रह केला असता प्रथम 'माता' हा शब्द येतो व त्यानंतर 'पिता' हा शब्द येतो. म्हणून वारसाहक्काचे बाबतीत पित्यापेक्षा मातेला प्राधान्य द्यायला हवे.'

यावर जीमूतवाहनांचे मत असे की, ''एक शेषद्वंद्वाच्याच आधारे 'पितरौ' या शब्दाने पित्याचाच प्राधान्याने बोध होतो व नंतर त्यातील द्विवचनाची जाणीव होऊन कल्पनेने मातेचा बोध होतो.[११]

विज्ञानेश्वर मातेच्या प्रथम अधिकाराविषयी सांगताना कारण देतात की, पित्यापेक्षा माता ही पुत्रांच्या जास्त सन्निध मानली जाते. म्हणून विशेष सामीप्यामुळे मातेलाच प्रथम धनाधिकार मिळणे योग्य आहे. 'अनन्तर:

सपिण्डाद्यः तस्य तस्य धनं भवेत्' या वचनावरून माता व पिता यापैकी माताच प्रथम धन ग्रहण करणारी ठरते.

प्रथम मातेचा धनग्रहणाधिकार सांगणारी मनु बृहस्पती यांची वचने जीमूतवाहनांनी उद्धृत केली आहेत पण त्याविषयी जीमूतवाहन स्पष्ट उल्लेख करतात की, ही दोन्ही वचने पित्यापर्यंतच्या वारसांचा अभाव असताना लागू होतात, असे समजावे.

मातेपूर्वी आणि दौहित्रानंतर पित्याचा वारसाहक्क असणे योग्यच आहे कारण मृताचा पिता पितरांना असे पिंडद्वय अर्पण करतो, ज्यात त्याचा मृत पुत्र अंश प्राप्त करीत असतो. या **उपकारकत्वाच्या** कारणामुळे दौहित्रानंतर प्रपिता धनग्रहण करतो असे जीमूतवाहन सांगतात.[१२]

याशिवाय भ्रातादींपूर्वी मातेला वारसाहक्क मिळणे योग्य असल्याचे स्पष्टीकरण जीमूतवाहन देतात की, गर्भधारणा आणि पुत्रांचे पोषण करून तिने जे उपकार केलेले असतात, त्याची परतफेड अशा रीतीने व्हायला हवी. त्याचप्रमाणे अन्य पुत्रांना जन्म देऊन त्याद्वारे पुत्रांवर उपकारच करीत असते, कारण ते अन्य पुत्र जे पिंड अर्पण करतात, त्या पिंडांमध्ये मृत निपुत्रिक व्यक्तीला अंश मिळतो. याठिकाणीही जीमूतवाहनांनी उपकारकत्वालाच प्राधान्य दिले आहे.

सारांश, 'सामीप्य' हे तत्त्व अनुसरून विज्ञानेश्वर प्रथम मातेचा अधिकार असल्याचे सांगतात तर 'उपकारकत्व' या तत्त्वाचा आधार घेऊन जीमूतवाहन पित्याला प्राधान्य देतात.

## माता-पिता यांच्या अभावी भाऊ

विज्ञानेश्वर आणि जीमूतवाहन दोघेही माता-पिता यांच्या अभावी मृत निपुत्रिकाचा भाऊ धनग्रहण करतो, असे सांगतात.

ज्या भावांना वारसाक्रमाने मृत निपुत्रिक भावाच्या धनावर हक्क प्राप्त होणार असतो, त्यात सोदर व भिन्नोदर दोघेही भाऊ असताना मिताक्षरेने सोदर भावांना प्राधान्य दिलेले आहे. याचे कारण कोणते, तर - प्रत्यासत्ती - जे विज्ञानेश्वरांनी वारसाक्रम ठरविण्यासाठी आधारभूत मानले आहे. सोदर भावांमध्ये मृत

व्यक्तीच्या माता-पित्याचा अंश असतो. तर भिन्नोदर भावांचे बाबतीत - त्याची व मृताची माता भिन्न-भिन्न असल्याने दोघांमध्ये फक्त पित्याचा अंश समान असतो. त्यामुळे सोदर भाऊ हे भिन्नोदर भावांपेक्षा मृत व्यक्तीला अधिक जवळचे आहेत, असे मानले जाते.[१३]

जीमूतवाहनांनी दायभागात विष्णु-याज्ञवल्क्यवचनांच्या आधारे[१४] माता-पित्याच्या अभावी भाऊ निपुत्रिकाचे धन घेतात असे सांगितले आहे. हे धन भावांकडे जाणे कसे न्याय्य आहे, हे 'उपकारकत्वा'च्या आधारे ते स्पष्ट करतात - धन ग्रहण करणारा जो भाऊ, तो याचे माता-पिता आणि इतर पूर्वजांना जे पिंडदान करीत असतो, त्यात ती मृत व्यक्तीही हिस्सा प्राप्त करून घेत असते. त्याचप्रमाणे ती मृत व्यक्ती ज्या मातामहादींना पिंडत्रय अर्पण करण्यास बांधली गेली असते, त्या पूर्वजांना मृताचा भाऊ पिंडदान करतो. अशा रीतीने तो आपल्या मृत भावाची जागा घेतो.

दोघांनीही आपल्या तत्त्वाला अनुसरून माता-पित्याच्या अभावी भावाचा अधिकार सिद्ध केला आहे.

## भावांच्या अभावी त्यांचे पुत्र

विज्ञानेश्वर आणि जीमूतवाहन या दोघांनीही भावांच्या अभावी त्याच्या पुत्रांना वारसाक्रमात स्थान दिले आहे.

मिताक्षरेने पौत्रांना वारसाहक्काने मिळणाऱ्या पितामहाच्या धनासंबंधी जी 'पितृतो भागकल्पना' मांडली आहे, तीच कल्पना मिताक्षरेने इथे लागू केली आहे. ती अशी - धनाचे विभाजन होण्यापूर्वीच जर एखादा भाऊ मरण पावला तर संपत्तीचे विभाजन करताना, त्या मृत भावाचा हिस्सा त्याच्या पुत्रांना प्राप्त होईल.[१५]

जीमूतवाहन 'उपकारकत्वा'च्या कसोटीवर असा क्रम निश्चित करतात की, भ्रातृपुत्राचे बाबतीतही प्रथम सोदर भावाचा पुत्र व त्याच्या अभावी असोदर भावाचा पुत्र धनाधिकारी ठरतो. कारण सोदर भावाचा पुत्र मृताच्या पित्याला, त्याचप्रमाणे मृताच्या मातेलाही पिंड अर्पण करतो (कारण मृताची जी माता हीच

सोदर भावाच्या पुत्राची पितामही असते. असोदर भाऊ मात्र भिन्न स्त्रीपासून झालेला असल्याने सोदर भावाची जी माता, ती त्या असोदर भावाच्या पुत्राची पितामही असू शकत नाही.) आणि भिन्नोदर भावाचा पुत्र हा मृत निपुत्रिकाच्या पित्याला आणि स्वत:च्या पितामहीला पिंडदान करतो.

विज्ञानेश्वर सुद्धा सोदर आणि असोदर दोन्ही भाऊ असताना सोदर भावालाच प्राधान्य देतात. या क्रमाचे बाबतीत विज्ञानेश्वरांनी प्रत्यासत्तीला महत्त्व देऊन 'अनन्तर: सपिण्डाद्य:, तस्य तस्य धनं भवेत्' या तत्त्वानुसार – मृत व्यक्ती आणि सोदर भाऊ यांची माता एक असल्याने दोघांमध्ये सामीप्य निर्माण झाले असते. म्हणून मृत निपुत्रिकाशी सामीप्य असणारा सोदर भाऊच प्रथम धनग्रहण करतो. त्यानंतर भिन्नोदर भाऊ धनग्राही ठरतो, असे विज्ञानेश्वर सांगतात.

सारांश, विज्ञानेश्वर आणि जीमूतवाहन यांनी वारसाक्रमाच्या निश्चितीचे बाबतीत भिन्न तत्त्वे अनुसरली असली तरी सारखाच वारसाक्रम सांगितला आहे, असे दिसते.

## सपिंडादि वारसांचा परिचय

याज्ञवल्क्यांनी भ्रातृपुत्रापर्यंतच्या वारसाच्या अभावी गोत्रज व्यक्ती वारस ठरतात, असे सांगितले आहे. मिताक्षरेनुसार गोत्रज म्हणजे पितामही. (जिचा या वर्गातील व्यक्तींमध्ये प्रथम क्रमांक आहे) त्यानंतर इतर **सपिंड व समानोदक** व्यक्ती. म्हणून याठिकाणी 'सपिंड' कोणाला म्हणावे, याचे स्पष्टीकरण देणे आवश्यक ठरते.

**सपिंड** हा शब्द सह (= बरोबर) आणि पिंड (= मृताला अर्पण केला जाणारा पिंड अथवा शरीर) या दोन संस्कृत शब्दांपासून तयार झाला आहे. पिंड शब्दाच्या दोन अर्थांपैकी जीमूतवाहनांनी पहिला तर विज्ञानेश्वरांनी दुसरा अर्थ मानलेला आहे. त्यानुसार विज्ञानेश्वरांच्या मते 'सपिंड' ती व्यक्ती होय, जिचे आणि मृत व्यक्तीचे (धनाचा स्वामी) शरीर एकच आहे – म्हणजेच ज्या व्यक्तीत आणि मृत व्यक्तीत एकाच शरीरातील भागांचा जास्तीतजास्त अंश आहे, जसे पित्याच्या शरीरातील जास्तीतजास्त अंश पुत्रामध्ये असल्याने तो पित्याचा सपिंड म्हणून पित्याच्या पश्चात् पहिला वारस ठरतो.

जीमूतवाहनांनी मानलेल्या 'पिंड' शब्दाच्या अर्थानुसार पिता व पुत्र हे दोघे पिंडकर्म या और्ध्वदेहिक विधीद्वारे संयुक्त झाले असतात, त्यामुळे पुत्र हा पित्याच्या पश्चात् त्याच्या धनाचा पहिला वारस ठरतो. महामहोपाध्याय श्रीधर–शास्त्री पाठक 'धर्म शास्त्रावरील व्याख्यानां'मध्ये हीच कल्पना मांडतात.[१६]

याज्ञवल्क्यांनी वारसांचा क्रम सांगताना 'सपिंड' हा शब्दप्रयोग न करता 'गोत्रज' असा प्रयोग केला आहे. मिताक्षरा सपिंड अथवा रक्ताचे नाते असलेल्यांचे दोन वर्ग असल्याचे सांगते.

१) **गोत्रज सपिंड** – अशा सपिंड व्यक्ती, ज्यांचे व मृत व्यक्तीचे गोत्र एक आहे. यात अखंड वंशावलीद्वारा मृताशी पित्याकडून संबद्ध असलेल्या व्यक्तींचा समावेश होतो. जसे – पुत्राचा पुत्र, पुत्राचा पौत्र अथवा भावाचा पुत्र.

२) **भिन्नगोत्र सपिंड** – मृत व्यक्तीचे व ज्यांचे गोत्र एक नाही अशा सपिंड व्यक्ती. म्हणजे मृत व्यक्तीशी स्त्री–नातेवाईकांकडून संबद्ध असलेल्या व्यक्ती. जसे – बहिणीचा पुत्र, भावाच्या कन्येचा पुत्र इ. भिन्नगोत्रसपिंड व्यक्तींना विज्ञानेश्वरांनी 'बंधु' ही संज्ञा दिली आहे.

**गोत्रज सपिंड** व्यक्ती २ वर्गांमध्ये विभागल्या आहेत.

१) ज्यांना 'सपिंड' म्हटले जाते

२) समानोदक

यावरून, मिताक्षरेमध्ये 'सपिंड' शब्द २ अर्थांमध्ये उपयोगात आणला आहे. त्याचा विस्तृत स्वरूपातील अर्थ घेतल्यास – 'रक्तसंबंधाने मृताशी जोडल्या गेलेल्या व्यक्ती म्हणजे 'सपिंड' आणि संकुचित अर्थ घेतल्यास 'पित्याकडील सातव्या पिढीपर्यंतचे आणि मातेकडील पाचव्या पिढीपर्यंतच्या व्यक्ती 'सपिंड' होत.[१७]

मिताक्षरा वारसांचे तीन वर्गांमध्ये विभाजन करते –

१) गोत्रज सपिंड २) समानोदक ३) बंधु

### १) गोत्रज सपिंड

एखाद्या व्यक्तीचे 'गोत्रज सपिंड' म्हणविल्या जाणाऱ्या व्यक्ती –

१) त्या व्यक्तीचे ६ पुरुषवंशज – पुत्र, पौत्र इ.

तक्त्यामधील S1 to S6

२) त्या व्यक्तीचे ६ पुरुषपूर्वज व त्यांच्या पत्नी

त्या व्यक्तीचे पिता, पितामह, प्रपितामह इ. आणि माता, पित्याची माता इ. म्हणजेच तक्त्यामधील F1 to F6 व त्यांच्या पत्नी M1 to M6.

मिताक्षरेने सांगितलेले सपिंडादि वारस पुढील तक्त्यामधून स्पष्ट होतील –

F 13 - X1 to X13
F 12 - X1 to X13
F 11 - X1 to X13
F 10 - X1 to X13
F 9 - X1 to X13
F 8 - X1 to X13
F 7 - X1 to X13

M6 - F6 - X1 - X2 - X3 - X4 - X5 - X6 - X7 - to X13
M5 - F5 - X1 - X2 - X3 - X4 - X5 - X6 - X7 - to X13
M4 - F4 - X1 - X2 - X3 - X4 - X5 - X6 - X7 - to X13
M3 - F3 - X1 - X2 - X3 - X4 - X5 - X6 - X7 - to X13
M2 - F2 - X1 - X2 - X3 - X4 - X5 - X6 - X7 - to X13
M1 - F1 - X1 - X2 - X3 - X4 - X5 - X6 - X7 - to X13

Wife Owner
Daughter 1
Daughter's Son S1
S2
S3
S4
S5
S6
S7 to S13

३) पुरुष पूर्वजांचे ६ आनुषंगिक अथवा गौण वंशज –

१) तक्त्यामधील F1 चे X1 to X6 वंशज. म्हणजेच त्या व्यक्तीचे

भाऊ, भावाचे पुत्र–पौत्र इ..

२) F2 चे X1 to X6 वंशज, म्हणजेच काका, त्यांचे पुत्र इ..

३) F3 चे X1 to X6 वंशज. म्हणजेच पित्याचे काका इ.

४) F4 चे X1 to X6 वंशज

५) F5 चे X1 to X6 वंशज

६) त्या व्यक्तीची पत्नी, कन्या आणि कन्येचा पुत्र.

या तक्त्यावरून लक्षात येईल की, मृत व्यक्तीपासून प्रारंभ करून व तिला धरून ७ पिढ्यांपर्यंत सपिंडता असते. पत्नी ही विवाहानंतर पतीची सपिंड समजली जाते.

२ व्यक्ती एकमेकींच्या 'सपिंड' तेव्हा म्हणवितात, जेव्हा त्यांच्या शरीरातील अंश समान असतो व त्याद्वारे त्या संबद्ध झाल्या असतात.

पुत्र हा पित्याचा सपिंड म्हणविला जातो कारण पित्याच्या शरीरातील अंश त्याच्यात आलेला असतो. तसेच याच कारणामुळे पितामह व पौत्र हेही एकमेकांचे सपिंड म्हणविले जातात.

पुत्र हा मातेचा सपिंड असतो कारण मातेच्या शरीरातील अंश त्याच्यात असतो. मातेकरवी तो मातामहाचाही सपिंड झाला असतो. तो मातामहाचा सपिंड असल्याने त्याद्वारे मामा व मावशी यांचाही तो सपिंड असतो.

काका व त्यांच्या पत्नीशीही सापिंड्य मानले जाते. तसेच पत्नी ही पतीची सपिंड असते कारण पतीशी संबंध आल्याने ती पुत्रोत्पत्ती करीत असते.

अशाप्रकारे सपिंड वारसांची आपण माहिती पाहिली.

**२) समानोदक**

मृत व्यक्ती धरून ७ पिढ्यांपर्यंत सपिंडत्व असते, हे आपण पाहिले. त्यापुढील, म्हणजे ८ ते १४ पिढ्यांपर्यंतच पुरुष समानोदक म्हणवितात.

**तक्त्यामध्ये लाल शाईने निर्देशिलेले सर्व 'समानोदक' होत.**

१) त्या व्यक्तीच्या स्वत:च्या वारसांपैकी S7 to S13

२) पूर्वजांपैकी F7 to F13

३) F1 पासून F6 शी संबद्ध गौण व्यक्ती X7 to X13

४) F7 पासून F13 शी संबद्ध गौण व्यक्ती X1 to X13

'समानोदक' म्हणजे त्या व्यक्ती होत, ज्या मृताला श्राद्धाचे वेळी उदकदान करतात.

### ३) बंधु

सपिंड आणि समानोदक यांच्या अभावी 'बंधु' वारस ठरतात. 'बंधु' म्हणजे अशा व्यक्ती होत, जे रक्ताचे नातेवाईक असून स्त्रियांद्वारे मृताशी संबद्ध झालेले असतात.

मिताक्षरा या 'बंधु' नामक वर्गाचे ३ विभाग मानते –

१) **आत्मबंधु –** म्हणजेच स्वत:चे बंधु. यात समाविष्ट होणाऱ्या व्यक्ती –
पित्याच्या बहिणीचा पुत्र
मातेच्या बहिणीचा पुत्र
मातेच्या भावाचा पुत्र

२) **पितृबंधु –** पित्याचे बंधु
पित्याच्या पित्याच्या बहिणीचा पुत्र
पित्याच्या मातेच्या बहिणीचा पुत्र
पित्याच्या मातेच्या भावाचा पुत्र

३) **मातृबंधु –** मातेचे बंधु
मातेच्या पित्याच्या बहिणीचा पुत्र
मातेच्या मातेच्या बहिणीचा पुत्र
मातेच्या मातेच्या भावाचा पुत्र

हा महत्त्वाच्या बंधूंचा निर्देश होय. याच्या अनुषंगाने येणाऱ्या बऱ्याच बंधूंचा समावेश होतो.

अशाप्रकारे मिताक्षरेने मानलेले सपिंड व इतर वारस आपण पाहिले.

दायभागाने 'सपिंड' शब्दाचा मिताक्षरेहून भिन्न अर्थ लावला आहे. त्याने 'सपिंड' मधील 'पिंड'चा – मृताला अर्पण केला जाणारा पिंड असा अर्थ घेऊ घेऊन त्या पिंडदानाद्वारे मृत व्यक्तीला जे उपकारकत्व प्रदान केले जाते. त्या आधारावर जीमूतवाहनांना वारसांचा क्रम निश्चित केला आहे.

या 'उपकारकत्वा'ची कल्पना येण्यासाठी त्यामागची भूमिका समजावून घेणे आवश्यक आहे -

हिंदूंची अशी कल्पना आहे की, चेतना ही शाश्वत असून ठराविक काली शरीर निरुपयोगी झाल्यावर शरीराला ती सोडून जाते. मनुष्याच्या निधनानंतर त्याचे शरीर निकामी बनते परंतु आत्मा मात्र सर्व ऐहिक उत्कट इच्छांसह मागे राहतो. मनुष्याच्या निधनानंतरही तो आत्मा खाद्यपेयांची इच्छा करतो. या त्याच्या इच्छापूर्तीसाठी श्राद्धविधी सांगितला आहे. अशा परिस्थितीत जो त्या मृत व्यक्तीची संपत्ती घेतो, त्याने मृत व्यक्तीच्या अतृप्त आत्म्याला पिंडदान करून तृप्त करणे योग्यच होय. 'अग्नी' हे देवांचे मुख समजले जाते. त्यामुळे या स्वर्गीय आत्म्यांना अग्नीद्वारे अन्न प्रदान केले जाते. अशा रीतीने मृताच्या नावाने केल्या जाणाऱ्या यज्ञविधीला 'श्राद्ध' असे म्हणतात.

निरनिराळ्या श्राद्धप्रकारांमध्ये हे एकोद्दिष्ट आणि पार्वण हे २ प्रकार निर्देश्य आहेत. त्यापैकी एकोद्दिष्ट श्राद्ध एकाच मृत व्यक्तीसाठी केले जाते. त्याच्या मृत्युनंतर ११व्या दिवशी अथवा मृत्युनंतर १ वर्षभर मृताच्या उपकारकत्वासाठी अशी १६ श्राद्धे केली जातात.

पार्वण श्राद्ध हे महिन्यातील अमावस्येला अथवा विशिष्ट महिन्यातील कृष्णपक्षात, भाद्रपदातील अमावस्या - यावेळी केले जाते. मिताक्षरा याविषयी सांगते[१८] ।

याशिवाय 'सपिंडत्व' अथवा 'सपिंडीकरण' नामक विधी असतो. हा श्राद्धविधी मृताच्या निधनाला ज्या दिवशी १ वर्ष होते, त्यादिवशी अथवा मरणाच्या १२व्या दिवशी केला जातो, ज्यामुळे नुकत्याच मरण पावलेल्या व्यक्तीचा शरीर सोडून गेलेला आत्मा 'पितरां'मध्ये समाविष्ट होतो.

मृताची पत्नी आणि कन्या फक्त 'एकोद्दिष्ट' श्राद्धाच्याच अधिकारी असतात. तर पुत्र, पौत्र आणि प्रपौत्र पार्वणश्राद्धाचेही अधिकारी असतात. पुत्र-पौत्रांद्वारे प्राप्त होणारे उपकारकत्व मनुवचनाद्वारे[१९] जीमूतवाहन स्पष्ट करतात.

हे झाले पुत्रादि वारसांकडून मृताला मिळणाऱ्या उपकारकत्वाविषयी. पुत्राचा अभाव असताना जीमूतवाहन ज्याअर्थी पत्नीचा पतीच्या धनावर अधिकार स्थापित होत असल्याचे सांगतात, त्याअर्थी पत्नीही पतीला उपकारक ठरत

असलीच पाहिजे.

व्यासवचनावरून जीमूतवाहन सांगतात की, ‘‘पतीच्या पश्चात् ब्रह्मचर्य धारण करून व्रतस्थ राहणारी मितभोगी स्त्री पतीला सुखद–उत्कृष्ट स्थानाप्रत तारून नेण्यास समर्थ असते’’ या उपकारकत्वामुळे ती धनग्रहण करणारी ठरते.

**दायभागानुसार सपिंडादि वारसांचा परिचय**

जीमूतवाहनांनी आधारभूत मानलेल्या ‘उपकारकत्व’ नामक तत्त्वाचा पाया ‘पार्वणश्राद्ध’ या विधीवर आधारलेला आहे. या विधीमध्ये श्राद्धकर्ता ३ विभिन्न प्रकारचे बली पूर्वजांना अर्पण करतो.

१) पिंड – अविभक्त पिंड

२) पिंडलेप – पिंड ज्या घटकांचा बनविला आहे, ते मिश्रण हाताने सारखे करीत असताना पिंडाचा जो शेष भाग हाताला चिकटतो त्यालाच ‘पिंडलेप’ म्हणतात. हा विभक्त पिंड असतो.

३) उदकदान.

**१) सपिंड**

‘पार्वण’ नामक श्राद्धविधीमध्ये पिंडदान करण्याच्या अधिकारानुसार जीमूतवाहनांनी सपिंडत्व निश्चित केले आहे. जीमूतवाहन याचे स्पष्टीकरण देतात – समजा २ हिंदू व्यक्ती एका पूर्वजाला पिंडदान करण्यास बांधल्या गेल्या आहेत. त्यापैकी एकाचे निधन झाले तर राहिलेला दुसरा त्या पूर्वजाला जे पिंडदान करील, त्यात ती मृत व्यक्ती हिस्सा प्राप्त करते. यावरून ती व्यक्ती – जी पिंडदान करते, ज्या व्यक्तीला उद्देशून पिंडदान केले जाते, आणि ती व्यक्ती – जी त्या पिंडामध्ये भागीदार होते, त्या सर्व एकमेकांच्या ‘सपिंड’ म्हणवितात.

तेव्हा दायभागानुसार एखादी व्यक्ती त्यांची **सपिंड** म्हणविली जाते.

१) ज्यांना पिंडदान करण्यास जीवित असताना तो बांधलेला असतो. यात पित्याकडील ३ पूर्वज व मातेकडील ३ पूर्वजांचा समावेश होतो.

२) त्या व्यक्तीच्या निधनानंतर जे त्याला पिंडदान करण्यास बांधले असतात – त्याचे पुत्र, पौत्र, प्रपौत्र, दौहित्र, पुत्राच्या कन्येचा पुत्र, पौत्राच्या कन्येचा पुत्र.

३) ज्यांना पिंडदान करण्यास ती मृत व्यक्ती बांधलेली होती, त्यांनाच पिंड अर्पण करण्यास इतरही व्यक्ती बांधलेल्या असतात, त्या इतर व्यक्ती मृताच्या सपिंड म्हणवितात.

यात पित्याकडे ३ आणि मातेकडून ३ पूर्वजांचा समावेश होतो.

या तिसऱ्या विभागाचे **४ उपविभाग** पाडले जातात –

१) यात अशा व्यक्तींचा समावेश होतो, ज्या व्यक्ती त्यांच्या स्वत:च्या (पित्याकडील) पूर्वजांना पिंडदान करतात, जे त्या मृत व्यक्तीचेही पित्याकडील पूर्वज असतात.

यात भाऊ, भावाचा पुत्र, भावाचा पौत्र, काका, काकांचा पुत्र, काकांचा पौत्र, पित्याचे काका – त्यांचा पुत्र व पौत्र यांचा अंतर्भाव होतो.

यापैकी भाऊ तीन पिंड पित्याकडील पूर्वजांना अर्पण करतो, जे मृताचेही पूर्वज असतात. भावाचा पुत्र २, काका व काकांचा पुत्र २ व उरलेले ५ प्रत्येकी १ पिंड अर्पण करतात.

याठिकाणी आपल्याला दिसून येईल की, वर उल्लेखिलेल्या ९ व्यक्तींचे आणि मृत व्यक्तीचे पित्याकडील पूर्वज सारखेच असतात.

२) दुसऱ्या उपविभागात अशा व्यक्तींचा अंतर्भाव होतो, ज्या व्यक्ती त्यांच्या मातेकडील पूर्वजांना पिंडदान करतात, ते पूर्वज धनाच्या स्वामीचेही (पित्याकडील) पूर्वज असतात व त्यांना पिंडदान करण्यास तो बांधलेला असतो.

यात खालील व्यक्तींचा समावेश होतो – बहिणीचा पुत्र, पित्याच्या बहिणीचा पुत्र, पितामहाच्या बहिणीचा पुत्र, भावाच्या पुत्राच्या कन्येचा पुत्र, काकांच्या कन्येचा पुत्र, पित्याच्या काकांच्या कन्येचा पुत्र, काकांच्या पुत्राच्या कन्येचा पुत्र.

यापैकी बहिणीचा पुत्र मृताच्या (पित्याकडील) ३ पूर्वजांना ३ पिंड अर्पण करतो, जे पूर्वज त्या बहिणीच्या पुत्राचे मातेकडील पूर्वज असतात. पित्याच्या बहिणीचा पुत्र व काकांच्या मुलीचा मुलगा हे मृताचा पितामह व प्रपितामह यांना प्रत्येकी २ पिंड अर्पण करतात, जे त्यांचे मातेकडील पूर्वज असतात. भावाच्या मुलीचा मुलगा मृताचे पिता व पितामह यांना २ पिंड अर्पण करतो, जे त्याचे

मातेकडील पूर्वज होत. उरलेले ५ मृताच्या ३ (पित्याकडील) पूर्वजांपैकी एकाला प्रत्येकी १ पिंड अर्पण करतात, जे त्यांचे मातेकडील पूर्वज असतात.

मिताक्षरेने या वारसांना **'बंधु'** असे नामाभिधान दिलेले आहे.

३) यात अशा व्यक्तींचा समावेश होतो, ज्या त्याच्या (पित्याकडील) पूर्वजांना पिंडदान करतात, जे मृत व्यक्तीचे मातेकडील पूर्वज असतात. त्या व्यक्ती म्हणजे –

मामा, मामांचा पुत्र–पौत्र, मामांचे काका व मामांच्या काकांचे पुत्र–पौत्र, मामांच्या पित्याचे काका – त्यांचे पुत्र–पौत्र.

मृत व्यक्तीचा मामा त्याच्या (पित्याकडील) पूर्वजांना २ पिंड अर्पण करतो, जे मृताचे मातेकडील पूर्वज असतात. मामाचे पुत्र, मामाचे काका, मामाच्या काकांचे पुत्र त्यांच्या पित्याकडील पूर्वजांना २ पिंड अर्पण करतात, जे मृताचे मातेकडील पूर्वज असतात. राहिलेल्या ५ व्यक्ती मृताच्या मातेकडील पूर्वजांपैकी एकाला प्रत्येकी १ पिंड अर्पण करतात, जे त्यांचे पित्याकडील पूर्वज असतात.

मिताक्षरेनुसार हे सर्व 'मातृबंधु' आहेत.

४) या विभागात अशा व्यक्तींचा अंतर्भाव होतो, ज्या व्यक्ती त्यांच्या मातेकडील पूर्वजांना पिंडदान करतात, जे मृताचेही मातेकडील पूर्वज असतात. त्या व्यक्ती म्हणजे –

मावशीचा पुत्र, मातेच्या आत्याचा पुत्र, मातेच्या पित्याच्या आत्याचा पुत्र, मामाच्या मुलींचा पुत्र, मामाच्या पुत्राच्या कन्येचा पुत्र, मातेच्या काकांच्या पुत्राच्या कन्येचा पुत्र, मातेच्या पित्याच्या काकांच्या पुत्राच्या कन्येचा पुत्र.

मावशीचा पुत्र हा त्याच्या स्वत:चे आणि मृताचेही जे मातेकडील पूर्वज आहेत, अशा तिघांना ३ पिंड अर्पण करतो. मातेच्या पित्याच्या बहिणीचा पुत्र, मामाच्या कन्येचा पुत्र आणि मातेच्या काकांच्या मुलीचा पुत्र हे प्रत्येकी २ पिंड त्यांच्या स्वत:च्या आणि मृताच्याही मातेकडीलच असलेल्या पूर्वजांना अर्पण करतात. उरलेले ५ सपिंड मृताच्या मातेकडील पूर्वजांपैकी एकाला प्रत्येकी १ पिंड अर्पण करतात.

मिताक्षरेनुसार हे सपिंड 'मातृबंधु' म्हणून मानले गेले आहेत.

### स्त्री-सपिंड

दायभागाने ५ स्त्री सपिंड मानले आहेत. ते असे -

विधवा पत्नी, कन्या, माता, पित्याची माता आणि पितामहाची माता. सापत्न मातेला सपिंड मानलेले नाही.

पत्नी ही पतीची सपिंड असते. कारण पुत्राच्या अभावी ती श्राद्धविधी करीत असते. माता, त्याची माता व पित्याच्या पित्याची माता ही 'सपिंड' होत. कारण त्या त्यांच्या पतीला अर्पण केलेल्या पिंडांमध्ये सह-भागीदार असतात आणि कन्या ही स्वत: पिंडदान करीत नसली तरी तिचा पुत्र हा पिंडदान करीत असल्याने, ती सपिंड म्हणविली जाते.

### सकुल्य

ज्या पितरांना 'पिंडलेप' अर्पण केला जातो व जो ते अर्पण करतो, ते एकमेकांचे सकुल्य म्हणवितात.

स्वत:च्या पित्याकडील ३ पूर्वजांना पिंड अर्पण केल्यावर त्याचा जो शेष भाग तो प्रपितामहानंतरच्या ३ पूर्वजांना अर्पण केला जातो. प्रपौत्रानंतरचे ३ वंशज पिंडलेप अर्पण करतात. हे प्रपितामहानंतरचे ३ पूर्वज आणि प्रपौत्रानंतरचे ३ वंशज सकुल्य म्हणवितात.

सकुल्यांमध्ये सर्व पुरुषांचाच समावेश होतो.

मिताक्षरेने दायभागाप्रमाणे सकुल्यांचा असा वेगळा वर्ग मानलेला नाही. या वारसांचा ती गोत्रज सपिंडांमध्येच अंतर्भाव करते.

### समानोदक

ज्या व्यक्ती उदकदान करतात, आणि ज्यांना ते केले जाते, त्या व्यक्ती एकमेकांच्या समानोदक म्हणविल्या जातात.

मिताक्षरेनुसार गोत्रज हे एकतर सपिंड अथवा समानोदक असतात. बृहन्मनु[२०] वचनाद्वारे मिताक्षरा सांगते की, सातव्या पुरुषानंतर 'सपिंड' हे नाते नष्ट होते आणि समानोदक हे नाते १४व्या पुरुषानंतर नष्ट होते.

दायभागानुसार एखाद्या व्यक्तीचे 'समानोदक' ते असतात -

१) ज्या व्यक्तींना उदकदान करण्यास तो बांधलेला असतो

२) ज्या व्यक्ती त्याला उदकदान करण्यास बांधलेल्या असतात

३) ज्या व्यक्तींना उदकदान करण्यास तो बांधलेला असतो त्याच व्यक्तींना उदकदान करण्यास बांधलेल्या इतर व्यक्ती.

यात सर्व पुरुष वारसांचाच अंतर्भाव होतो.

अशारीतीने दायभागाने मानलेले सपिंडादि वारसांचे वर्ग आपण पाहिले.

## भ्रातृपुत्रांच्या अभावी धनग्रहण करणाऱ्या व्यक्ती

भ्रातृपुत्रांच्या अभावी गोत्रज व्यक्ती धन घेणाऱ्या असतात, असे मिताक्षरा सांगते.[२१] या गोत्रज व्यक्ती कोण? तर पितामही. गोत्रजांमध्ये पितामहीचा सर्वप्रथम उल्लेख केला जातो. अर्थातच पितामही सर्वप्रथम धनग्रहण करते.

'गोत्रज'चा 'समानगोत्रज' असा मिताक्षरेने अर्थ दिला आहे. पितामहीच्या अभावी पितामह, काका, त्यांचे पुत्र हे गोत्रज सपिंड धनग्रहण करतात. या वारसांच्या अभावी प्रपितामही, प्रपितामह, त्यांचे पुत्र व पौत्र वारस ठरतात.

गोत्रज व्यक्तींच्या अभावी 'बंधु' धनग्रहण करतात, असे मिताक्षरा मानते. या बंधूंच्या अभावी घराण्याचा पुरोहित - त्याअभावी शिष्य - त्याअभावी सब्रह्मचारी (म्हणजे एकाच गुरूकडून उपनयन, अध्ययन व अर्थप्राप्तीचे ज्ञान ज्यांनी करवून घेतले आहे) - त्याअभावी दुसरा वैदिक ब्राह्मण - वैदिक ब्राह्मणाचा अभाव असल्यास कोणत्याही ब्राह्मणाने ते धन घ्यावे. परंतु ब्राह्मणाचे धन राजाने मात्र कधीही घेऊ नये असा विशेष उल्लेख विज्ञानेश्वर करतात. याच आशयाचे मनुवचनही आहे.[२२]

आणि ब्राह्मण सोडून इतर वर्णांच्या व्यक्तींचे धन मात्र सर्व वारसांच्या अभावी राजा घेऊ शकतो.

मिताक्षरेने सांगितलेल्या भ्रातृपुत्राच्या अभावी वारस ठरणाऱ्या व्यक्ती आपण पाहिल्या.

यानंतर जीमूतवाहनांनी दायभागात सांगितलेला वारसाक्रम बघू -

भ्रात्रुपुत्राच्या अभावी भावाचा पौत्र वारस ठरत असल्याचे जीमूतवाहन सांगतात. याचे कारण अर्थातच उपकारकत्वच आहे. मृताच्या पित्याला तो पिंडदान करणारा असतो.

यानंतर ज्याप्रमाणे मृताच्या प्रपौत्रापर्यंतच्या पुरुषवंशजांच्या अभावी त्याच्या कन्येचा पुत्र हा वारस ठरतो, त्याचप्रमाणे पित्याच्या प्रपौत्रापर्यंतच्या वारसांच्या अभावी पित्याच्या कन्येचा पुत्र – अर्थातच मृताच्या बहिणीचा पुत्र हा त्याच्या धनाचा वारस ठरतो.[२३]

त्यानंतर मृताच्या आईचा भाऊ – अर्थातच मामा वारसा क्रमात स्थान प्राप्त करतो. या मातुलादि वारसांपैकी मृताचे मातामह जीवित असल्यास आधी त्यांच्याकडेच मृताचे धन जाते व त्याअभावी मामाकडे.

वरील सर्व वारसांच्या अभावी सकुल्य व्यक्ती, आचार्य अथवा शिष्य धनग्रहण करतात.

प्रपौत्रानंतरचे ३ वंशज आणि प्रपितामहानंतरचे ३ पूर्वज हे 'सकुल्य' आहेत. यापैकी प्रपौत्रानंतरच्या ३ वारसांना वारसाहक्क मिळतो.

अशा सकुल्यांच्या अभावी समानोदक वारस ठरतात. त्याअभावी वेदांचे अध्यापन करणारा आचार्य – त्या अभावी वेदाध्येता शिष्य व त्याअभावी सब्रह्मचारी धनग्रहण करणारा ठरतो.

उपर्युक्त सर्व वारसांच्या अभावी सगोत्र व्यक्ती वारस ठरतात.

वर उल्लेखिलेल्या सर्व वारसांच्या अभावी ब्राह्मण मृत व्यक्तीचे धन घेतात. मनुही असेच सांगतो.[२४]

वरील सर्व वारसांचा अभाव असताना ब्राह्मण सोडून इतर वर्णाच्या पुरुषांचे धन राजा घेतो.

आतापर्यंत भ्रातृपुत्राच्या अभावी धन घेणाऱ्या व्यक्तींबद्दल जीमूतवाहन आणि विज्ञानेश्वर यांची मते आपण पाहिली.

**वानप्रस्थादींच्या धनाचा विभाग**

एका विशेष वचनाद्वारे याज्ञवल्क्य[२५] आणि जीमूतवाहन सांगतात की, वानप्रस्थाश्रमी, यती व ब्रह्मचारी यांचे धन आचार्य – सच्छिष्य व धर्मभ्राता क्रमाने घेतात.

याबाबतीत स्पष्ट सांगितले आहे की, वर उल्लेखिलेला ब्रह्मचारी कसोशीने ब्रह्मचर्यपालन करणारा असावा. याशिवाय 'उपकुर्वाण' नामक ब्रह्मचारी असतो – जो काही दिवस अध्ययन करून नंतर पूर्वजांना उपकारक ठरावे म्हणून

विवाहबद्ध होतो - त्याचे धन त्याच्या माता-पित्याकडे जाते आणि यतीचे धन सच्छिष्याकडे जाते.

वर उल्लेखिलेल्या सर्व वारसांच्या अभावी एकाश्रमी व्यक्तीकडे मृत व्यक्तीचे धन जाते.[२६]

यावर अशी शंका येऊ शकते की, 'अनंशास्त्वाश्रमान्तरगता:' या वसिष्ठवचनानुसार गृहस्थाश्रम सोडून इतर आश्रमात प्रवेश केलेल्या व्यक्तींजवळ द्रव्य नसतेच तर त्यांच्या द्रव्याच्या विभागाचा प्रश्नच कुठे येतो ? ब्रह्मचारी आणि यतींचे बाबतीतही हा प्रश्न येऊ शकतो.

यावर मिताक्षरा सांगते की, '१ दिवस, १ महिना, ६ महिने अथवा १ वर्षासाठी धनसंचय करावा व संचित धन अश्विन महिन्यात खर्च करावे, असे वानप्रस्थाश्रमी व्यक्तींबद्दल सांगितल्यामुळे त्यांच्याजवळ धनसंचय संभवतो.

अशाप्रकारे वानप्रस्थादींच्या धनाविषयी मिताक्षरा व दायभागाचे विवेचन आपण पाहिले.

जीमूतवाहनांनी दायभागात उपकारकत्वाच्या आधारावर वारसाक्रमाची निश्चिती केली आहे. ती करताना उपकारकत्वाची काही तत्त्वे आधारभूत मानली आहेत. ती अशी -

१) एकोद्दिष्ट आणि पार्वण श्राद्धाद्वारे वारस हे मृत व्यक्तीला उपकारक ठरतात. परंतु ज्या व्यक्ती पार्वणश्राद्ध करतात, त्यांना एकोद्दिष्ट श्राद्ध करणाऱ्या व्यक्तींपेक्षा प्राधान्य दिले जाते. म्हणूनच एकोद्दिष्ट श्राद्ध करणाऱ्या विधवा पत्नी आणि कन्या यांच्यापेक्षा मृत व्यक्तीच्या पुत्राला वारसाक्रमाचे बाबतीत प्राधान्य दिले जाते.

२) मृताच्या पूर्वजांना अर्पण केलेल्या पिंडांपेक्षा - ज्यात मृत व्यक्ती त्याच्या निधनानंतर एक पूर्वज म्हणून भागीदार होते, त्या मृतालाच प्रत्यक्षत: अर्पण केलेला पिंड हा जास्त उपकारक मानला जातो. म्हणूनच इतर वारसांपेक्षा पुत्र-पौत्र-प्रपौत्र यांना वारसाहक्कात प्राधान्य दिले जाते.

३) मृत व्यक्तीच्या पित्याकडील पूर्वजांना अर्पण केलेले पिंड हे मातेकडील पूर्वजांना अर्पण केलेल्या पिंडांपेक्षा जास्त उपकारक असतात. भावाचा पुत्र हा स्वत:च्या **पित्याकडील** पूर्वजांना पिंडदान करतो, जे मृताचेही

पित्याकडील पूर्वज असतात. तर बहिणीचा पुत्र हा त्याच्या **मातेकडील** पूर्वजांना पिंडदान करीत असतो, जे मृताचे पित्याकडील पूर्वज असतात. या दोघांमध्ये भावाच्या पुत्राला प्राधान्य मिळते.

४) मृत व्यक्तीच्या पित्याला अर्पण केलेले पिंड हे त्याचे पितामह व प्रपितामह यांना अर्पण केलेल्या पिंडांपेक्षा जास्त उपकारक ठरतात. म्हणूनच भावाचा पुत्र अथवा पौत्र हे काकांपूर्वी धनाचे वारस ठरतात.

५) ज्यावेळी दोन वारस अर्पण करीत असलेल्या पिंडांची संख्या सारखी असते, त्यावेळी जो वारस मृताच्या जवळच्या नातेवाईकांना पिंडदान करतो, त्याला वारस म्हणून प्राधान्य दिले जाते.

६) स्वतःच्या मृत्युनंतर - एक पितर म्हणून त्याचा ज्यात हिस्सा आहे, अशा (पित्याकडील पूर्वजांना) अर्पण केलेल्या पिंडांपेक्षा प्रत्यक्षतः त्या मृत व्यक्तीला अर्पण केलेला पिंड हा जास्त उपकारक मानला जातो व म्हणूनच इतर सर्व वारसांपेक्षा पुत्र-पौत्र-प्रपौत्र यांना प्राधान्य दिले जाते.

या तत्त्वांचा आधार घेऊन जीमूतवाहनाने असा वारसाक्रम सांगितलेला आहे -

१) पुत्र २) पौत्र ३) प्रपौत्र ४) विधवा पत्नी ५) कन्या ६) कन्येचा पुत्र ७) पिता ८) माता

९) भाऊ १) सहोदर - अ) संसृष्ट ब) असंसृष्ट
२) भिन्नोदर - अ) संसृष्ट ब) असंसृष्ट

१०) भावाचा पुत्र - १) सहोदर २) भिन्नोदर

११) भावाचा पौत्र - १) सहोदर २) भिन्नोदर

१२) बहिणीचा पुत्र १३) पितामह १४) पितामही १५) काका १६) काकांचा पुत्र १७) काकांचा पौत्र १८) पित्याच्या बहिणीचा पुत्र १९) प्रपितामह २०) प्रपितामही २१) पित्याचे काका २२) पित्याच्या काकांचा पुत्र २३) पित्याच्या काकांचा पौत्र २४) पितामहाच्या बहिणीचा पुत्र

**यानंतर मृत व्यक्तीचे मातेकडील नातेवाईक**

२५) मातेचा पिता २६) मामा २७) मामाचा पुत्र २८) मामाचा पौत्र २९) मावशीचा पुत्र.

या सर्व वारसांच्या अभावी मृताच्या सकुल्य व्यक्ती वारस होतात.

सकुल्यांच्या अभावी समानोदक, आचार्य, शिष्य, सब्रह्मचारी व राजा अनुक्रमे वारस ठरतात.

याठिकाणी एका गोष्टीचा निर्देश करणे आवश्यक आहे की, वर उल्लेखिलेल्या वारसांपैकी १२, १८, २४ या क्रमसंख्येचे वारस हे मिताक्षरेनुसार 'बंधु' आहेत आणि ते 'बंधु' म्हणविले जाणारे वारस मिताक्षरा मानीत असलेल्या समानोदकांनंतरच वारस होऊ शकतात, तत्पूर्वी नाही.

**मिताक्षरेने सांगितलेला वारसाक्रम असा**

१) पुत्र २) पौत्र ३) प्रपौत्र ४) विधवा पत्नी ५) कन्या ६) कन्येचा पुत्र ७) माता ८) पिता

९) भाऊ - १) सहोदर २) भिन्नोदर

१०) भावाचे पुत्र - १) सहोदर २) भिन्नोदर

११) भावाचे पौत्र १२) पित्याची माता १३) पित्याचे पिता १४) पित्याचे काका १५) पित्याच्या काकांचा पुत्र १६) पित्याच्या काकांचे पौत्र

यात सर्व सपिंडांचा समावेश झालेला नाही. परंतु ज्यांचा समावेश झालेला नाही, ते सपिंड इतके दूरचे आहेत की, त्यांच्याकडे वारसाहक्क जाण्याची क्वचितच वेळ येते. त्यांचाही निर्देश करण्यास हरकत नाही.

१७) पित्याच्या पित्याची माता १८) पित्याच्या पित्याचे पिता १९) पित्याच्या पित्याचा भाऊ २०) पित्याच्या पित्याच्या भावाचा पुत्र २१) पित्याच्या पित्याच्या भावाचा पौत्र.

या सपिंडांच्या अभावी समानोदक वारस ठरतात.

या समानोदकांच्या अभावी 'बंधु'

१) आत्मबंधु

२) पितृबंधु

३) मातृबंधु

बंधूंच्या अभावी - आचार्य, शिष्य, सब्रह्मचारी आणि या सर्व वारसांच्या अभावी राजा.

अशाप्रकारे मिताक्षरा व जीमूतवाहन यांनी सांगितलेला वारसाक्रम आपण

पाहिला.

जीमूतवाहनांनी **उपकारकत्वाच्या** आधारावर वारसाक्रम निश्चित केला आहे तर मिताक्षरेने **'प्रत्यासत्ती'**च्या आधारावर, दोघांची तत्त्वे भिन्न असल्याने दोघांनी सांगितलेल्या क्रमामध्ये थोड्या प्रमाणात फरक असणे साहजिकच आहे.

परंतु या दोघांनी सांगितलेल्या क्रमात साम्यही आहेच. कारण दोघांनीही पूर्णत: आपल्या तत्त्वाचे पालन न करता दोन्ही तत्त्वांना आधारभूत मानलेले दिसते.

१) मिताक्षरा आणि जीमूतवाहन यांनी सांगितलेला भ्रातृसुतापर्यंतचा वारसाक्रम पाहिल्यास माता-पिता यांच्यातील वारसाक्रमाचा फरक सोडल्यास भ्रातृसुतापर्यंतचा क्रम दोघांनीही सारखाच मानलेला आहे.

२) उपकारकत्व हीच कसोटी लावल्यास पिता आणि काका दोघांनाही वारस म्हणून एकाचवेळी स्थान मिळायला हवे. कारण दोघेही पिंडद्वय अर्पण करतात. याठिकाणी जीमूतवाहनांनी काकांपूर्वी पित्याला प्राधान्य दिल्यामुळे त्याने 'प्रत्यासत्ती' ही विचारात घेतलेली दिसते.

३) जीमूतवाहन केवळ उपकारकत्व हेच तत्त्व मानतात, असे असते तर श्राद्धाधिकारी व्यक्तींचा जो क्रम आहे, त्या क्रमाने वारसाहक्काने धन मिळविणाऱ्या व्यक्तींचा क्रम राहिला असता. परंतु जीमूतवाहनांनी सांगितलेला - पुत्र - पौत्र - प्रपौत्र - विधवा - पत्नी - कन्या - कन्येचा पुत्र - पिता - माता - सहोदर भाऊ - भिन्नोदर भाऊ - सहोदर भावाचा पुत्र - भिन्नोदर भावाचा पुत्र - हा वारसाक्रम पाहिल्यास तो क्रम मृत व्यक्तीचे श्राद्ध करण्यास पात्र असणाऱ्या व्यक्तींच्या क्रमाहून भिन्न आहे, असे लक्षात येईल.

४) संसृष्ट भावांविषयी पाहू जाता उपकारकत्वाला डोळ्यासमोर न ठेवता संसृष्ट भावांना जीमूतवाहनांनी वारसाक्रमात प्रथम स्थान दिले आहे.

५) जवळजवळ सर्वच स्त्री वारसांचे बाबतीत - जसे पत्नी, कन्या, माता, पितामही - जीमूतवाहनांनी उपकारकत्व आधारभूत मानलेले नाही.

६) मृताच्या मातेकडील नातेवाईकांपेक्षा पित्याकडील नातेवाईकांना वारसाहक्काचे बाबतीत प्राधान्य दिलेले मिताक्षरेप्रमाणेच दायभागातही दिसून येईल. वास्तविक मातेकडील सपिंड हे पित्याकडील सपिंड व्यक्तींपेक्षा जास्त

पिंड अर्पण करणारे असतात, ज्यात ती मृत व्यक्ती भागीदार होते. तरीही म्हणजेच मातेकडील सपिंड उपकारकत्वाच्या दृष्टीने श्रेष्ठ असले तरी पित्याकडील सपिंडांनंतर त्यांना वारसाक्रमात स्थान मिळाले आहे. अर्थातच केवळ उपकारकत्वाचाच विचार न करता प्रत्यासत्तीचाही जीमूतवाहनांनी विचार केला आहे .

७) 'अनन्तर: सपिण्डाद्य: तस्य तस्य धनं भवेत्' (९.१८७)

या मनुवचनाच्या आधारे 'प्रत्यासत्ती' हे तत्त्व अनुसरले आहे. 'सपिंडत्व' आणि 'रक्तसंबंध' यांचा आधार घेऊन मिताक्षरेने वारसाक्रमाची निश्चिती केली असली तरी त्यातील कोणत्या वारसाला प्राधान्य द्यावे, याचा निर्णय बऱ्याच खटल्यांमध्ये **'पिंडदान करण्याची अर्हता'** यावरूनच केला जातो. (Buddha Singh V. Lattu Singh 37A 604, 623) याविषयी Privy Council विधान करते की, 'It is a mistake to suppose that the doctrine of spiritual benefit does not enter into the scheme of inheritance propounded in the Mitakshara.[२७]

वरील सर्व मुद्द्यांचा अभ्यास केल्यावर असे म्हणता येईल की, कोणत्याही एकाच तत्त्वाच्या आधारे वारसाक्रमाची निश्चिती करता येत नाही, तर ही दोन्ही तत्त्वे परस्परसंबद्ध आहेत याविषयी कायदेग्रंथातील एक सुंदर विवेचन जसेच्या तसे उद्धृत करते आहे - "A man did not inherit because he performed funeral rites, or made religious offerings. He inherited because he was the nearest of kin to the deceased, and he made religious offerings for exactly the same reason."[२८]

अर्थातच दोन्ही तत्त्वांचा समन्वय साधल्याशिवाय वारसांचा क्रम सांगता येणे शक्य नाही. मिताक्षरा आणि दायभागाने त्याचेच अनुसरण केले आहे.

श्री. सर्वाधिकारी तर सांगतात की, दोघांनीही सांगितलेला वारसाक्रम हा **'प्रत्यासत्ती'** या तत्त्वावर आधारलेला असून 'प्राधान्य कोणत्या वारसाला द्यावे' हे ठरविताना दोघेही **उपकारकत्वाचा** आधार घेतात.

अशा रीतीने प्रत्यासत्ती आणि उपकारकत्व ही दोन्ही तत्त्वे एकमेकांना कशी

पूरक आहेत आणि वारसांचा क्रम निश्चित करताना मिताक्षरा आणि जीमूतवाहन यांनी त्यांचा उपयोग कसा करून घेतला आहे, याचे विवेचन झाले.

## संदर्भसूची


१. तथा विष्णु अपुत्रस्य धनं पत्न्यभिगामि, तदभावे दुहितृगामि, तदभावे पितृगामि, तदभावे मातृगामि, तदभावे भ्रातृगामि, तदभावे सकुल्यगामि, तदभावे बन्धुगामि, तदभावे शिष्यगामि, तदभावे सहाध्यायिगामि, तदभावे ब्राह्मणधनं वर्ज्यं राजगामि। – विष्णु १७.४.१३
– दायभाग (११.१०५) मध्ये उल्लेखित

२. बृहस्पति – दायभाग (११.१.२) मध्ये उल्लेखित

३. 'पत्नी विवाहसंस्कृता' पत्युर्नो यज्ञसंयोगे (पा. ४.१.३३) इति स्मरणात्। ताश्च बह्वयश्चेत् सजातीया विजातीयाश्च तदा यथांशं विभज्य धनं गृह्णन्ति। – मिताक्षरा. याज्ञवल्क्य स्मृती २.१३५.१३६

४. पत्नीत्वञ्च प्रथमं उत्तमवर्णायाः। ज्येष्ठा पत्नीत्यभिधानात् वर्णक्रमेण ज्येष्ठत्वात्। तदाह मनुः – "यदि स्वाश्चपराश्चैव विन्देरन् योषितो द्विजाः। तासां वर्णक्रमेणैव ज्येष्ठां पूजा च वेश्म च" ९.८५ – अतः परिणयन–कनिष्ठापि सवर्णा ज्येष्ठैव तस्या एव यज्ञादिषु व्यापाराधिकारात् पत्नीत्वम्।
– जीमूतवाहन. दायभाग ११.१.४७

५. जङ्गमं स्थावरं हेम कुप्यं धान्यं रसाऽम्बरम्। आदाय दापयेच्छ्राद्धं मासषण्मासादिकम्। पितृव्यगुरुदौहित्रान् भर्तुः स्वस्त्रीयमातुलान् पूजयेत् कव्यपूर्त्ताभ्यां वृद्धानातिथीन् स्त्रियः। – बृहस्पति.
– दायभाग (११.१.२) मध्ये उल्लेखित

६. भर्तुः धनहरी पत्नी तां विना दुहिता स्मृता। अङ्गादङ्गात्सम्भवति पुत्रवद् दुहिता नृणाम्। तस्मात्पितृधनं त्वन्यः कथं गृह्णीत मानवः। – बृहस्पति २५.५५–५६
– याज्ञवल्क्य स्मृतीवरील मिताक्षरा टीकेत उल्लेखित

७. दुहितरं विशिनष्टि नारदः। पुत्राभावे च दुहिता तुल्यसन्तानदर्शनात्। पुत्रश्च

दुहिता चोभे पितुः सन्तानकारिके।
दुहितुरधिकारे सन्तानदर्शनहेतुतया निगदितं सन्तानश्च पिण्डदोभिमतः अपिण्डदस्य अनुपकारकत्वेन अन्यसन्तानात् असन्तानाच्चाविशेषात्।
दौहित्रश्च तत्पिण्डदाता ..........।
– दायभाग ११.२.१–२

८. अतः पुत्रवती सम्भावितपुत्रा चाधिकारिणी।
वन्ध्या विधवा दुहितृप्रसूत्यादिना विपर्यस्तपुत्रा पुनः अनधिकारीण्येवेति दीक्षितमतमादरणीयम्। – दायभाग ११.२.३–५

९. यथाह विष्णुः – अपुत्रपौत्रसन्ताने दौहित्राः धनमाप्नुयुः। पूर्वेषां तु स्वधाकारे पौत्रा दौहित्रिका मता।।

१०. अकृता वा कृता वाऽपि यं विन्देत्सदृशात्सुतम्। पौत्री मातामहस्तेन दद्यात् पिण्डं हरेत् धनम्। – मनु ९.१३६, याज्ञवल्क्य स्मृती (२.१३५–१३६) वरील मिताक्षरा टीका, दायभाग ११.२.२० मध्ये उल्लेखित

११. पितरौ इत्यत्र च पितृक्रम एवावगम्यते। तथाहि पितृपदात् प्रातिपादिकात् प्रथमं द्विवचनबलेन एकशेषकल्पनया मातुरवगमात्। – दायभाग ११.३.४

१२. न्यायगतश्चैतत् दौहित्रात् परतो मातृतश्च पूर्वं पितुः अधिकार इति मृतपिण्डभोग्यान्यपिण्डद्वयदातुर्दौहित्रात् मृतभोग्यान्य पिण्डद्वयमात्रदातृतया पितुः जघन्यत्वात्, मात्रादिभ्यस्तु पिण्डद्वयदातृतया बीजस्य चैवं योन्याश्च बीजमुत्कुष्टमुच्यते (मनु ९.३५) इति मनुवचनावगतोत्कर्षेण च बलवत्वात्।
– दायभाग ११.३.३

१३. पित्रभावे भ्रातरौ धनभाजः। भ्रातृष्वपि सोदराः प्रथमं गृह्णीयुः भिन्नोदराणां मात्रा विप्रकर्षात्। अनन्तरः सपिण्डाद्यः तस्य तस्य धनं भवेत्। मनु (९.१८७) इति स्मरणात्।
– याज्ञवल्क्य स्मृती (२.१३५–१३६) वरील मिताक्षरा टीका

१४. न्याय्यं चैतत् मृतधनिभोग्य पित्रादित्रय पिण्डदानेन भ्रातुः उपकारकत्वात् तथा तद्देयमातामहादिपिण्डत्रयदानेन तत्स्थानपाताच्च अनेवंरूपात् भ्रातृपुत्रात् बलवत्वात् मातृमूलत्वाच्च भ्रातुः एवंरूपस्य मातृतो जघन्यतेति मातृतः परत एवाधिकारो युक्तः। – दायभाग ११.५.३

१५. यदात्वपुत्रे भ्रातरि स्वर्याते भ्रातॄणामविशेषेण धनसम्बन्धे जाते भ्रातृधन-विभागात्प्रागेव यदि कश्चित् भ्राता मृतस्तदा तत्पुत्राणां पितृतोधिकारे प्राप्ते तेषां भ्रातॄणां च विभज्य धनग्रहणे पितृतो भगाकल्पना इति युक्तम्।
– याज्ञवल्क्य स्मृती (२.१३५-१३६) वरील मिताक्षरा टीका

१६. मिताक्षराकृत दायो रक्तसम्बन्धमनुसृत्य प्रतिपादित:। दायभागे तु स पिण्डदानद्वारा पिण्डग्राहिद्वारा च। अनयो: उभयोरपि अयं क्रम: सपिंडदानुरोधादेव केवलम्। ..... सपिंडशब्दार्थ: – समान: एक: पिण्डो देह: यस्य स: सपिण्ड: ........। सपिण्डता च एकशरीरान्वयेन भवति। तथाहि पुत्रस्य पितृशरीरावयवान्वयेन पित्रा सह सापिण्डयम्।

१७. पञ्चमात् सप्तमादूर्ध्वं मातृत: पितृतस्तथा – याज्ञवल्क्य स्मृती १.५३
मिताक्षरा – 'मातृत: मातु: सन्ताने पञ्चमादूर्ध्वं पितृत: पितु: सन्ताने सप्तमादूर्ध्वं सापिण्डयं निवर्तते इति शेष:।

१८. एक: उद्दिष्ट: यस्मिन् श्राद्धे तदेकोद्दिष्टामिति कर्मनामधेयम् – याज्ञवल्क्य स्मृती (१.२५१) वरील मिताक्षरा टीका.
तत्र त्रिपुरुषोद्देशेन यत्क्रियते तत्पार्वणम्। एकपुरुषोद्देशेन क्रियमाणमे-कोद्दिष्टम्। – याज्ञवल्क्य स्मृती (१.२.११७) वरील मिताक्षरा टीका

१९. पुत्रेण लोकान् जयति पौत्रेण आनन्त्यं अश्नुते। अथ पुत्रस्य पौत्रेण बध्नस्याप्नोति पिष्टपम्। – मनु ९.१३७ – दायभाग ११.३१ मध्ये उल्लेखित

२०. यथाह बुहन्मनु:। सपिण्डता तु पुरुषे सप्तमे विनिवर्तते। समानोदकभावस्तु निवर्तेत चतुर्दशात्। जन्मनाम्नो: स्मृतेरेके तत्परं गोत्रमुच्यते।
– याज्ञवल्क्य स्मृती (२.१३८) वरील मिताक्षरा टीका

२१. भ्रातृपुत्राणामभावे गोत्रजा धनभाज:। गोत्रजा: पितामही सपिण्डा: समानोदकाश्च। तत्र पितामही प्रथमं धनभाक्।
– याज्ञवल्क्य स्मृतीवरील (२.१३६) मिताक्षरा टीका

२२. 'अहार्यं ब्राह्मणद्रव्यं राज्ञा नित्यमिति स्थिति:' – मनु ९.१.१८९

२३. पितुरपि प्रपौत्र पर्यन्ताभावे पितृदौहित्रस्याधिकारो बोद्धव्य: धनिदौहित्रस्येव।
– दायभाग ११.६.८

२४. सर्वेषामप्यभावे तु ब्राह्मणा: रिक्थहारिण:।

त्रैविद्याः शुचयो दान्ताः एवं धर्मो न हीयते। – मनु ९.१८८

– दायभाग ११.६.२६ मध्ये उल्लेखित

२५. वानप्रस्थयतिब्रह्मचारिणां रिक्थभागिनः।

क्रमेणाचार्यसच्छिष्य धर्मभ्राता एकतीर्थिनः। – याज्ञवल्क्य स्मृती २.१३७

२६. वानप्रस्थयति ब्रह्मचारिणां धनं धर्मभ्रातृसच्छिष्यआचार्याः गृह्णीयुः, तदभावे एकतीर्थी एकाश्रमी गृह्णीयात्। – दायभाग ११.६.३५

२७. गोलपचंद्र सरकार शास्त्री यांच्या ‘A Treatise on Hindu Law’, P.No. 555 यांत उल्लेखित

२८. Mayne’s Hindu Law, Para 514 (7th Edn)



## प्रकरण आठवे

# भिन्नवर्णांच्या भावांमधील संपत्तीचे विभाजन

## अथवा

# एकाच पुरुषाला भिन्नवर्णांच्या स्त्रियांपासून झालेल्या पुत्रांमध्ये केले जाणारे संपत्तीचे विभाजन

'विभागं चेत्पिता कुर्यात्' याद्वारे सांगितलेले समानजातीय भावांमध्ये आणि समानजातीय भाऊ आणि पिता यांच्यात होणाऱ्या विभाजनाविषयी याज्ञवल्क्यांनी सांगितले. परंतु कुटुंबात भिन्नजातीय भाऊ असल्यास धनविभाजन कसे व्हावे, याविषयी याज्ञवल्क्य सांगतात –

असे हे भिन्नजातीय भाऊ कुटुंबात असणे केव्हा शक्य आहे? तर पित्याने इतर वर्णांच्या स्त्रियांशी विवाह केला असतांना.

याज्ञवल्क्य[१] आणि मनुवचनाद्वारे जीमूतवाहनांनी अशी व्यवस्था सांगितली आहे की, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य पुरुषाने सवर्णस्त्रीशीच विवाह करावा. परंतु इच्छा असल्यास विप्रवर्णाचा पुरुष क्षत्रिय, वैश्य, शूद्र स्त्रीशी, क्षत्रिय वर्णाचा पुरुष वैश्य, शूद्र स्त्रीशी आणि वैश्य वर्णाचा पुरुष सवर्ण स्त्रीबरोबरच शूद्र स्त्रीशी विवाह करू शकतो. शूद्राला फक्त शूद्र स्त्रीशीच विवाह करता येतो.

मिताक्षराही या व्यवस्थेला सहमत असावी. कारण तसे नसल्याचा उल्लेख आढळत नाही. अशा भिन्नवर्णाच्या स्त्रियांपासून पुत्रप्राप्ती झाल्यास त्यांना मिळणाऱ्या विभागाविषयी – याज्ञवल्क्य सांगतात[२] – ब्राह्मणाला चारही वर्णांच्या स्त्रियांपासून संतती असल्यास प्रत्येक पुत्राला वर्णानुसार क्रमशः ४, ३, २ आणि १ भाग संपत्तीतील मिळतो.

क्षत्रिय पुरुषाला क्षत्रिय स्त्रीपासून झालेल्या प्रत्येक पुत्राला ३ भाग, वैश्य स्त्रीपासून झालेल्या प्रत्येक पुत्रास २ भाग आणि शूद्रस्त्रीपासून झालेल्या पुत्राला १ भाग प्राप्त होतो.

वैश्य पुरुषाचे बाबतीत – वैश्य स्त्रीपासून झालेल्या प्रत्येक पुत्राला २ आणि

शूद्र स्त्रीपासून झालेल्या प्रत्येक पुत्राला १ भाग मिळतो.

शूद्राला फक्त शूद्र स्त्रीशीच विवाह करण्याची मुभा असल्याने त्याच्या पुत्रांमध्ये समविभाजनच होईल.

जीमूतवाहन एका मनुवचनाद्वारे सांगतात की, ब्राह्मणाला सवर्णस्त्रीपासून झालेल्या पुत्राला संपत्तीतील ३ भाग आणि वर्णानुसार क्रमश: ३ भाग, २ भाग, १ भाग[1,2] आणि १ भाग मिळावा.

जीमूतवाहनांनी एक वेगळ्या प्रकारचा विभाग सांगताना म्हटले आहे की, ब्राह्मणाला क्षत्रिय स्त्रीपासून झालेला पुत्र हा जन्माने आणि गुणांनी सर्व पुत्रांपेक्षा ज्येष्ठ असेल तर तो ब्राह्मणस्त्रीपासून झालेल्या पुत्राला मिळणाऱ्या विभागा-इतक्याच भागाचा अधिकारी असतो. तर ब्राह्मण अथवा क्षत्रियाला वैश्य स्त्रीपासून झालेला पुत्र अशा परिस्थितीत क्षत्रिय पुत्राबरोबर तेवढ्याच भागाचा अधिकारी होतो.[3] अर्थातच या विभाजनात वर्णापेक्षा गुणांना जास्त महत्त्व दिले आहे.

एक विशेष उल्लेख जीमूतवाहन करतात की, विप्रवर्णाच्या पुरुषाला सर्व वर्णांपैकी फक्त शूद्रस्त्रीपासूनच पुत्र असला तर त्याला संपत्तीतील तिसरा भाग मिळावा. उरलेले २ भाग सपिंड व त्यांच्या अभावी सकुल्यांना मिळावेत. या दोघांच्याही अभावी पिंडदानाचा अधिकार असणाऱ्याला ते धन मिळते.

क्षत्रिय आणि वैश्य पुरुषाला फक्त शूद्र स्त्रीपासूनच पुत्र असताना तो पित्याची १/२ इस्टेट घेतो आणि उरलेला अर्धा भाग त्या वारसांना मिळतो, ज्यांना निपुत्रिकाचे धन मिळते.

शूद्रस्त्रीपासून झालेल्या पुत्राला मिळणाऱ्या विभागाविषयी आपण पाहिले. हा जो विभाग, तो शूद्रस्त्रीच्या उत्तम गुणयुक्त पुत्राविषयी सांगितला आहे असे समजावे. कारण मनुने शूद्रपुत्राला धन देण्याचा निषेधच केला आहे.[4]

शूद्रपुरुषाला दासी अथवा इतर अपरिणीता शूद्र स्त्रीपासून पुत्र असल्यास तो पित्याच्या इच्छेने अंशग्रहण करणारा ठरतो. पित्याच्या मृत्युनंतर त्याच्या भावांनी (परिणीता पत्नीच्या पुत्रांनी) त्याला १/२ भाग द्यावा. भाऊ नसले तर विवाहित कन्या आणि त्यांचे पुत्र व त्यांचा अभाव असताना दासीपुत्रालाच संपूर्ण धन मिळते, असे याज्ञवल्क्य सांगतात.

याबद्दल जीमूतवाहन सांगतात की, 'असा पुत्र भाऊ-बहिणी-बहिणीचे पुत्र नसतांना सर्व धन प्राप्त करतो.'

शूद्राला दासी अथवा अपरिणीता शूद्रस्त्रीपासून झालेल्या पुत्राला मिळणाऱ्या विभागाविषयी याज्ञवल्क्य आणि जीमूतवाहनांचेही मत आपण पाहिले.

ब्राह्मणपुत्राचे बाबतीत भूमीविषयीचा एक विशेष दोघांनीही सांगितला आहे की, ब्राह्मणाला प्रतिग्रह-स्वरूपात प्राप्त झालेली जी भूमी ती फक्त ब्राह्मणस्त्रीपासून झालेल्या पुत्रांनाच मिळावी. क्षत्रियादि पुत्रांना त्यावर अधिकार नसतो.

ब्राह्मण सोडून इतर द्विजातीय पुत्रांच्या अधिकाराविषयी **जीमूतवाहन** नमूद करतात की, प्रतिग्रह स्वरूपात मिळालेल्या भूमीवर क्षत्रियादींना अधिकार नसला तरी क्षत्रिय आणि वैश्य स्त्रीपासून झालेल्या पुत्रांना गृहक्षेत्रादि वाडवडिलार्जित संपत्तीवर अधिकार असतो. शूद्रस्त्रीपासून झालेल्या पुत्राला दोन्ही ठिकाणी वगळले आहे.

याविषयी **मिताक्षरा** स्पष्ट उल्लेख करीत नाही. परंतु विज्ञानेश्वरांना शूद्रस्त्रीपासून झालेल्या पुत्राविषयीचे उपर्युक्त मत मान्य असावे.

## संदर्भसूची


१. तिस्रो वर्णानुपूर्व्येण तथैका यथाक्रमम्।
ब्राह्मणक्षत्रियविशां भार्या स्वा शूद्रजन्मनः।।
– याज्ञवल्क्य स्मृती, आचार अध्याय, ५७

२. चतुस्त्रिद्व्येकभागाः स्युः वर्णशो ब्राह्मणात्मजाः क्षत्रजास्त्रिद्व्येकभागा विड्जास्तु द्व्येकभागिनः। – याज्ञवल्क्य स्मृती २.१२५

३. विप्रेण क्षत्रियाजातो जन्मज्येष्ठो गुणान्वितः।
भवेत् समांशः क्षत्रेण वैश्याजातस्तथैव च।। – बृहस्पती – दायभाग ९.१५

४. ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्रापुत्रो न रिक्थभाक्।
यदेवास्य पिता दद्यात्तदेवास्य धनं भवेत्।। मनु ९.१५५, दायभाग ९.२७


❀ ❀ ❀

## प्रकरण नववे

# पुत्रिकापुत्र आणि औरसपुत्र दोघेही असताना केली जाणारी दायग्रहणव्यवस्था

समान-असमान जातीच्या पुत्रांमध्ये होणाऱ्या धनविभाजनाविषयी सांगून 'मुख्य-गौण पुत्रांमधील दायव्यवस्था' हा विषय यापुढे याज्ञवल्क्यांनी हाताळला आहे. तत्पूर्वी मुख्य गौण पुत्रांच्या स्वरूपाचे मिताक्षरेने केलेले विवेचन पाहू -

धर्मपूर्वक विवाहिता पत्नीपासून झालेला पुत्र हा **औरसपुत्र** म्हणवितो.[१]

**पुत्रिकापुत्र** हा औरसपुत्राप्रमाणेच मानला गेला आहे. हा दोन प्रकारचा असल्याचे मानतात.

१) निपुत्रिक पुरुषाने कन्येलाच पुत्र मानले असता तिला 'पुत्रिका' म्हटले आहे.

२) 'अभ्रातृकां प्रदास्यामि'[२] अशा प्रकारच्या वचनाद्वारे स्वत:ची कन्या विवाहात प्रदान केली असता त्या कन्येला झालेला पुत्र त्या मातामहाचा पुत्र समजला जातो.

मिताक्षरेने १२ प्रकारच्या पुत्रांचे वर्णन केले आहे. जीमूतवाहन त्यांचे वर्णन देवलवचनाच्या आधारे असे करतात - 'हे द्वादशपुत्र वंशविस्तार करणारे समजले जातात. त्यापैकी काही आत्मज (औरस, पौनर्भव, पुत्रिकापुत्र) काही परज (क्षेत्रजपुत्र) काही लब्ध (दत्त, क्रीत, सहोढज, कानीन, कृत्रिम), काही यादृच्छिक (अपविद्ध, स्वयमुपागत, गूढोत्पन्न) म्हणविले जातात.

या पुत्रांच्या धनाधिकाराविषयी पाहू जाता **औरस** पुत्राचा त्याच्या पित्याच्या धनावर असलेला एकमेव अधिकार विज्ञानेश्वर आणि जीमूतवाहन दोघांनीही मानलेलाच आहे.

औरस पुत्रानंतर दोघांनीही 'पुत्रिकापुत्रा'ला स्थान दिले आहे. औरस पुत्राचा अभाव असताना पितृधनावर पुत्रिकापुत्राचाच अधिकार निर्माण होतो. परंतु प्रथम कन्येला अथवा तिच्या पुत्राला पुत्र मानल्यावर औरसपुत्र जन्मला तर त्या दोघांनीही समभाग घ्यावा असे विज्ञानेश्वर आणि जीमूतवाहनांनीही मानले आहे. या समविभाजनाचे बाबतीत 'औरस आणि पुत्रिकापुत्र एकाच वर्णाचे असतील

तरच ते समविभागाचे अधिकारी होतील अन्यथा औरस आणि इतर वर्णाच्या पुत्रांचे बाबतीत जसे विभाजन होते, तसे केले जाईल' असा विशेष जीमूतवाहन सांगतात. मिताक्षरेने मात्र असा विशेष सांगितलेला दिसत नाही.

याबाबतीत पित्याशी आणि औरसपुत्राशी सवर्ण असणे अथवा नसणे यामुळे विभाजनात पडणारा फरक जीमूतवाहन सांगतात तर गुणवान असणे अथवा नसणे यामुळे पडणारा फरक विज्ञानेश्वरांनी सांगितला आहे. तो असा –

'षष्ठं तु क्षेत्रजस्य......' या वचनाचे स्पष्टीकरण गुणावगुणांना अनुसरून मिताक्षरा देते की, क्षेत्रजादि पुत्र औरस पुत्राला विरोधी असतील आणि निर्गुणही असतील तरी १/६ भाग त्यांना मिळतोच. तो फक्त औरसाला विरोधी आहे अथवा निर्गुण म्हणून नकोसा झाला आहे, तर १/५ भाग त्याला मिळतो.

जीमूतवाहनांनी गुणावगुण आणि सवर्ण–असवर्ण या भेदांना अवलक्षून त्याचे असे स्पष्टीकरण दिले आहे की, – क्षेत्रजादि पुत्रांपैकी जे पित्यापेक्षा खालच्या वर्णाचे असतील पण औरसपुत्रापेक्षा उच्च वर्णाचे असतील, ते १/५ अथवा १/६ भाग त्यांच्या गुणावगुणांनुसार मिळवतील.

'एक एव औरसोपुत्र:' या मनुवचनाचे स्पष्टीकरण दोघांनीही वेगवेगळे दिले आहे –

'औरसाव्यतिरिक्त असलेले इतर पुत्र औरसपुत्राला विरोधी असतील तर दयेने त्यांना अन्नवस्त्र द्यावे' असे विज्ञानेश्वर सांगतात.

तर 'इतर क्षेत्रजादि पुत्र पित्यापेक्षा निकृष्ट वर्णाचे असून औरसपुत्रापेक्षाही खालच्या वर्णाचे असतील तर त्यांना फक्त अन्नवस्त्र मिळविण्याचाच अधिकार असतो' असे जीमूतवाहनांनी सांगितले आहे.

पुत्रांच्या प्रकाराविषयी पाहू जाता विज्ञानेश्वरांनी याज्ञवल्क्यांना अनुसरून आणि जीमूतवाहनांनी देवलवचनाला अनुसरून मानलेले पुत्रांचे १२ प्रकार हे सारखेच आहेत. त्यापैकी औरस, क्षेत्रज, दत्त, कृत्रिम, गूढोत्पन्न आणि अपविद्ध हे ६ 'दायाद–बान्धव' आणि उरलेले ६ 'अदायाद–बान्धव' असल्याचे दोघेही मानतात.

'गोत्ररिक्थे जनयितु:' या मनुवचनाच्या आधारे दत्तकपुत्राचे बाबतीत – ज्याने त्याला दत्तक घेतले आहे, त्याच पित्याचे क्रियाकर्म करण्याचा अधिकार

त्याला असतो व त्याच्याच धनाचा तो अधिकारी होतो, खऱ्या पित्याच्या धनाचा नव्हे.

तर जीमूतवाहन 'यद्येकऋक्थिनौ स्यातां ........' या मनुवचनाच्या आधारे सांगतात की – 'औरस आणि क्षेत्रज पुत्र केवळ तीच संपत्ती घेऊ शकतील, ज्यावर त्यांच्या पित्याचाच अधिकार आहे, आणि त्याच पित्याचे धन ते घेऊ शकतात, ज्यांचे क्रियाकर्म करण्याचा अधिकार त्यांना आहे.

थोडक्यात, औरसपुत्राव्यतिरिक्त इतर पुत्रांना मिळणाऱ्या विभागाविषयी सांगताना विज्ञानेश्वर '**गुणहीन** किंवा **गुणवान** असणे' याचा तर जीमूतवाहन 'सवर्ण अथवा असवर्ण असणे' या गोष्टीचा प्रामुख्याने विचार करतात.

औरसादि पुत्रांचा धनाधिकार सांगताना मात्र 'पिंडदान करणारा जो पुत्र तोच धनातील अंश घेणारा ठरतो' हे तत्त्व दोघांनीही पाळलेले दिसते.

अशा रीतीने 'मुख्य-गौण पुत्रांमधील दायव्यवस्था' याविषयी जीमूतवाहन आणि विज्ञानेश्वर यांचे विचार आपण पाहिले.

## संदर्भसूची


१. औरसो धर्मपत्नीजः तत्समः पुत्रिकासुतः ।
क्षेत्रजः क्षेत्रजातस्तु सगोत्रेण इतरेण वा ।।
– याज्ञवल्क्य स्मृती २.१२८

२. 'अभ्रातृकां प्रदास्यामि तुभ्यं कन्यामलङ्कृताम् । अस्यां यो जायते पुत्रः स मे पुत्रः भवेदिति ।। – वसिष्ठ १७.११६
– याज्ञवल्क्य स्मृतीवरील (२.१२८) मिताक्षरा टीका आणि दायभाग (१०.४) मध्ये उल्लेखित




## प्रकरण दहावे

# विभाज्य–अविभाज्य निरूपण

धनाचे विभाजन करताना सर्वच धन विभागले जात नाही. कारण काही प्रकारचे धन अविभाज्य मानले गेले आहे. तेव्हा धनाचे विभाजन करीत असताना कोणते विभाज्य आहे आणि कोणते अविभाज्य, हे माहिती असणे आवश्यक आहे.

प्रथम विभाज्य धनाचा उल्लेख करताना[१] कात्यायनवचनावरून जीमूतवाहन सांगतात की, ''पितामह आणि पिता यांच्या मालकीचे धन आणि भावांपैकी एखाद्याने स्वत: प्राप्त केलेले धन हे विभाजनाचे वेळी विभागले जावे.''

सर्वसाधारणपणे अविभाज्य मानले जाणाऱ्या धनाबद्दल सांगताना, माता–पित्याच्या धनाचा व्यय न करता मिळविलेले, मित्राकडून मिळालेले, विवाहात प्राप्त झालेले जे धन त्यात भावांचा हिस्सा नसतो. पूर्वी कुणी हरण केलेले पित्याकडून आलेले धन – पण असामर्थ्यामुळे पित्रादींनी परत मिळविले नाही, मात्र पुत्रांपैकी एखाद्याने इतरांच्या अनुज्ञेने परत मिळविले तर त्यात दायादांचा अंश नसल्याचे याज्ञवल्क्य सांगतात.[२]

विज्ञानेश्वर आणि जीमूतवाहन दोघेही मानतात की, जे धन पित्याच्या वा साधारण संपत्तीचा व्यय करून प्राप्त केले असेल, ते सर्व विभाज्यच होय. याउलट जे साधारण धनाचा व्यय न करता केवळ स्वत:चे श्रम आणि धन याद्वारे संपादन केले असेल, ते अविभाज्य मानावे. हेही योग्यच होय. कारण 'साधारण–धनात' सर्वच भागीदारांच्या समान अंश असल्याने त्याचा व्यय करून संपादन केलेल्या धनात सर्व भागीदारांचा अंश असायलाच हवा. आणि केवळ स्वत:च्या श्रमांनी व धनाद्वारे मिळविलेल्या धनावर केवळ अर्जकाचाच हक्क असणेही उचितच होय.

वारसाहक्काने येणारे धन हे विभाज्य असल्याचे सांगितले आहे. पण याला एक अपवाद विज्ञानेश्वर आणि जीमूतवाहन असा सांगतात की, वाडवडिलार्जित धनापैकी काही धन दुसऱ्याने हरण केले परंतु असामर्थ्यामुळे पिता वा इतर

भागीदारांनी ते मिळविले नाही. पुढे मुलांपैकी एखाद्याने हरणकर्त्यापासून ते धन परत मिळविले, तर ते त्या अर्जकाचे स्वार्जित धन असते. त्यात इतरांना विभाग मिळत नाही. परंतु यातही एक विशेष असा की, परत मिळविलेले धन जर भूमीच्या स्वरूपात असले तर अर्जकाला त्यातून चौथा भाग मिळतो व इतरांना उरलेल्या भागातून समभाग प्राप्त होतो.

उपर्युक्त नियमही युक्तच वाटतो कारण इतर भागीदारांनी असामर्थ्यामुळे वा प्रतिकारपराङ्मुखतेमुळे दुसऱ्याने हरण केलेले धन परत मिळविण्याचे धाडस केले नसते. ते धन एखाद्या भागीदाराने स्वत: परत मिळविल्यास त्यावर इतर भागीदारांचा अधिकार असण्याचे कारणच नाही.

विज्ञानेश्वर व जीमूतवाहन दोघांनीही वस्त्रप्रावरणे, अश्वादि वाहने, अलंकार, अन्न, जल, दासीव्यतिरिक्त इतर स्त्रिया इ. धनाचे अविभाज्यत्व मानले आहे.

विद्याधनाचे अविभाज्यत्व दोघांनीही मानले आहे. जीमूतवाहन विद्याधनाचा बराच विस्तृत अर्थ घेतात. कोणतेही ज्ञान अथवा कलाकौशल्याद्वारे मिळविलेले धन विद्याधन असल्याचे ते सांगतात.

एका नारद वचना[३]द्वारे जीमूतवाहनांनी विद्याधन अविभाज्य असल्याचा **अपवाद** सांगताना असा निर्देश केला आहे की, एक भाऊ विद्यार्जन करणाऱ्या दुसऱ्या भावाच्या कुटुंबाचे पोषण करीत आहे. अशावेळी विद्येद्वारे तो भाऊ जे धन प्राप्त करील, ते धन कुटुंबपोषण करणाऱ्या भावाचे बाबतीत विभाज्यच मानले जाईल, जरी तो भाऊ अविद्य असेल. (जीमूतवाहनांनी अविद्य व्यक्तीला विद्याधनातील अंश देऊ नये असे कात्यायन, गौतमादींच्या वचनाद्वारे सांगितले आहे. हा विशेष मिताक्षरा सांगत नाही.)

अशा रीतीने बऱ्याच अंशी सारखीच असलेली विभाज्य-अविभाज्य धनाविषयीची विज्ञानेश्वर आणि जीमूतवाहनांची मते आपण पाहिली.

## वृत्तविभागसन्देहनिर्णय

धनाच्या विभाजनाविषयी साद्यंत माहिती दिल्यावर त्या धन-विभाजना-विषयी काही कारणास्तव संदेह असता त्याची निश्चिती कशी करावी, यावरील विज्ञानेश्वर आणि जीमूतवाहन यांनी केलेले विवेचन पाहू -

विज्ञानेश्वर आणि जीमूतवाहन या दोघांनीही ज्ञाती, बंधु, इतर नातेवाईक यांची साक्ष, लेख्यप्रमाण, वाटणीपत्र, गृहक्षेत्र यांचे पृथक्त्व, शेतीची कामे, धर्मानुष्ठाने आणि अन्न शिजविणे या क्रिया वेगवेगळ्या असणे – थोडक्यात पृथक्कार्यप्रवर्तन – हे निर्णयहेतु सांगितले आहेत.[४]

'साक्ष' या निर्णयहेतुविषयी दोघेही सांगतात, ज्यात ज्ञाती, बंधु आणि इतर साक्षीदारांच्या साक्षींचा समावेश होतो. जीमूतवाहनांनी ज्ञाती म्हणजेच सपिंड व्यक्तींनी दिलेल्या साक्षीला सर्वाधिक प्राधान्य दिले आहे. त्यांच्याअभावी बंधु, त्यांच्या अभावी इतर उदासीन साक्षीदारांकडून विभागनिश्चिती व्हावी असे ते सांगतात. यासाठी नारदवचनाचाही ते उल्लेख करतात.[५]

जीमूतवाहन आणि विज्ञानेश्वरांनीही ज्ञाती इत्यादींच्या साक्षीनंतर लेख्याला प्राधान्य दिले आहे. 'लिखितं तु साक्षिभ्यो बलवदेव इत्युक्तम्' असे वचन आहे.

यानंतर पृथक्कार्यप्रवर्तन. यात दान करणे, दानाचा स्वीकार करणे, धार्मिक कार्य, गृह–क्षेत्र परिवारातील दास–दासी, अन्न शिजविणे, धनाचा आय–व्यय इ. कार्ये विभक्त भावांमध्ये पृथक्–पृथक् आढळतात.

जीमूतवाहनांनी 'ज्या भावांमध्ये उपर्युक्त व्यवहार उघडउघड चालत असतील, त्यांच्या पृथक्त्वाविषयी लेख्य प्रमाण उपलब्ध नसले तरीही त्यांना विभक्तच समजावे' असे सांगितले आहे .

विज्ञानेश्वरांनी साक्षी, लेख्य आणि पृथक्कार्यप्रवर्तन या विभागलिंगांविषयी सांगून त्या प्रकरणाला पूर्णविराम दिला आहे.

परंतु जीमूतवाहनांनी यापुढे आणखी एक निर्णयहेतु सांगितला आहे. तो म्हणजे अनुमान.

भागीदारांमध्ये पूर्वी केले गेलेले विभाजन याबाबतीत ज्यावेळी लेख्य अथवा साक्षी ही प्रमाणे नसतात, त्यावेळी अनुमानाद्वारे त्यांचे ज्ञान होऊ शकते. जसे – बलानुबन्ध, ताडनचिह्न इ. वरून साहसाचे अनुमान करता येते, तसेच 'स्वस्वामिक स्थावरस्य पृथक् भोग' हे स्थावराच्या पृथक्त्वाचे ज्ञापकचिन्ह होय. ज्यांचे आय–व्यय पृथक् असतील, ज्यांच्यात ऋणादान आणि इतर व्यवहार परस्परांमध्ये चालत असतील, त्यांना नि:संशयपणे विभक्त समजावे .

असे स्पष्टीकरण जीमूतवाहनांनी 'अनुमान' या निर्णयहेतुबद्दल केले आहे.

अशा रीतीने विज्ञानेश्वर आणि जीमूतवाहन यांनी सांगितलेले निर्णयहेतूंचा आपण आढावा घेतला.

## संदर्भसूची


१. पैतामहं च पित्र्यञ्च यच्चान्यत् स्वयमर्जितम्। दायादानां विभागे तु सर्वमेतद्विभज्यते। – कात्यायन
   – दायभाग ६.१.१ मध्ये उल्लेखित
२. पितृद्रव्याविरोधेन यदन्यत् स्वयमर्जितम्। मैत्रमौद्वाहिकं चैव दायादानां न तद्भवेत्। क्रमादभ्यागतं द्रव्यं हृतमप्युद्धरेत्तु यः। दायादेभ्यो न तद्दद्यात् विद्यया लब्धमेव च। – याज्ञवल्क्य स्मृती, २.११८–११९
३. कुटुम्बं बिभ्रृयात् भ्रातुर्यो विद्यामधिगच्छतः।
   भागं विद्याधनात्तस्मात् स लभेताश्रुतेऽपि सन्। – नारद १३.१०
   – दायभाग ६.१.१४ मध्ये उल्लेखित
४. विभागनिह्नवे ज्ञातिबन्धुसाक्ष्यभिः लेखितैः। विभागभावना ज्ञेया गृहक्षेत्रैश्च यौतकैः। – याज्ञवल्क्य स्मृती २.१४
५. विभागधर्मसन्देहे दायादानां विनिर्णयः। ज्ञातिभिः भागलेख्येन पृथक्कार्यप्रवर्तनात्। – नारद १३.३५




# समारोप

‘दायभागा’वरील ‘‘विज्ञानेश्वर आणि जीमूतवाहन यांच्या मतांचा तौलनिक अभ्यास’’ या शीर्षकाखाली आपण मुख्यत: ‘दाय’ आणि ‘विभाग’ या शब्दांचे निरूपण, विभाग करण्याचे अधिकारी आणि पद्धती – स्त्रीधन आणि अपुत्रधनाचा विभाग, विभाज्य–अविभाज्य धन आणि विभागानधिकारी यावरील विज्ञानेश्वर आणि जीमूतवाहन यांची मते पाहिली.

या अभ्यासावरून ‘दाय’ आणि ‘विभाग’ शब्दांचे निरूपण, विभाज्य–अविभाज्य धन, विभागानधिकारी व्यक्ती या मुद्यांवर जीमूतवाहन आणि विज्ञानेश्वर यांच्या मतांमध्ये फारसा फरक नाही, तर साम्यच जास्त आढळते. काही ठिकाणी मतांतर आहे. पण दोन टीकाकारांमध्ये ते स्वाभाविकच आहे.

वर उल्लेखिलेल्या विषयांमधील ‘अपुत्रधनविभाग’ हा असा एक विषय आहे की, ज्यावरील विवेचनात जीमूतवाहन आणि विज्ञानेश्वर यांच्या मतांमध्ये निर्देश्य फरक पडलेला आढळतो. इतर मुद्द्यांवरील थोड्याफार फरकाबरोबरच ‘अपुत्रधनविभाग’ नामक विषयावरील मतांमध्ये असलेल्या मोठ्या फरकामुळे जीमूतवाहन आणि विज्ञानेश्वर यांनी कायदेग्रंथातील काही विषयांवरील केलेल्या विवेचनात भिन्नता आढळते. परिणामत: दोन निरनिराळ्या भागांमध्ये या दोघांनी रचलेले कायदेग्रंथ प्रमाणभूत मानले जातात. बंगालमध्ये जीमूतवाहनांच्या ‘दायभागा’तील कायदा प्रमाण मानतात तर बंगालचा भाग सोडून इतरत्र मिताक्षरा कायदा मान्यता पावलेला आहे. केवळ बंगालमध्येच अन्य प्रकारचा कायदा कां मानला जातो, याचे कारण बंगाली हिंदूंच्या दोन उच्च जातींच्या सामाजिक इतिहासात शोधले जाऊ शकते –

बंगालमध्ये आदिसुर नामक एक हिंदू राजा होता तो राजा येण्यापूर्वी बंगालमध्ये बरीच शतके बौद्धधर्माचे प्राबल्य होते. कालांतराने ब्राह्मणवर्गावरही त्या धर्माचा काही अंशी प्रभाव पडला. बौद्धधर्माने प्रभावित झालेले असे हे ब्राह्मण लोक यज्ञसंबंधी शास्त्रे अवगत करतील अशी आशा नव्हती. अर्थातच या ब्राह्मणांना यज्ञक्रिया अवगत नव्हत्या. आदिसुराच्या राज्यात वेदशास्त्रनिपुण आणि यज्ञक्रिया पूर्णत: ज्ञात असणारा असा एकही ब्राह्मण नसल्याने ही उणीव राजाला

प्रकर्षाने जाणवत होती. कारण त्याला पुत्रेष्टि यज्ञाचा बोध करून देणाऱ्या अथवा त्या यज्ञाची क्रिया करवून घेणाऱ्या ब्राह्मणाची आवश्यकता होती. म्हणूनच आदिसुर राजाने वेदविद्यासंपन्न आणि यज्ञक्रिया यथास्थित पार पाडू शकतील असे ५ ब्राह्मण पाठविण्याची कान्यकुब्ज अथवा कनौजच्या राजाला विनंती केली. त्यानुसार ते ५ ब्राह्मण आले. या ब्राह्मणांपैकीच जो भट्टनारायण नामक ब्राह्मण, त्याचेच **जीमूतवाहन** हे सातवे वंशज होते. जीमूतवाहनांनी अशा सामाजिक परिस्थितीत नवीन कायद्याची सुरुवात कां केली याचे कारण इथे सापडू शकेल.

कनौजच्या राजाने ५ सुविद्य ब्राह्मणांबरोबरच ५ सुविद्य कायस्थही पाठविले होते, जे बंगालच्या राजाच्या जातीचे होते. बंगालमध्ये सध्या जे उच्च जातीतील ब्राह्मण आणि कायस्थ आहेत, ते वर उल्लेखिलेल्या कायस्थ आणि ब्राम्हणांचे वंशज आहेत. या नवीन आलेल्या ब्राह्मण आणि कायस्थांमध्ये बहुपत्नीत्व प्रचलित होते. त्यांच्या पुत्रांना आपली कन्या देण्यास पूर्वीपासून रहात आलेले ब्राह्मण आणि कायस्थ नेहमीच उत्सुक असत कारण त्यामुळे त्यांचा सामाजिक दर्जा उंचावत असे. या पुत्रांशी विवाहबद्ध झालेल्या बऱ्याच मुली आपल्या पित्याकडेच वास्तव्य करीत असत. याचा परिणाम असा झाला की, नवीन आलेले कायस्थ आणि ब्राह्मणवर्गाच्या पुत्रांचे त्यांच्या आईकडील नातेवाईकांशी संबंध दृढ होत गेले. त्यांच्या जीवनात पित्याकडील नातेवाईकांपेक्षा मातेकडील नातेवाईकांना महत्त्वाचे स्थान प्राप्त झाले.

याच कारणामुळे निपुत्रिकाच्या धनावरील वारसाहक्क सांगताना पित्याकडील दूरच्या नातेवाईकांपेक्षा मातेकडील जवळच्या नातेवाईकांना जीमूतवाहनांनी प्राधान्य दिलेले आहे.

इथे एका मुद्द्याचा उल्लेख करणे आवश्यक ठरते. मृत व्यक्तीच्या मातेकडील नातेवाईकांनी अर्पण केलेले पिंड हे पित्याकडील नातेवाईकांनी अर्पण केलेल्या पिंडांपेक्षा गौण असतात, हे विज्ञानेश्वर आणि जीमूतवाहन दोघेही मानतात. परंतु या गौण असण्याच्या कारणावरून ते दुर्लक्षिले जावेत, हे जीमूतवाहनांना मान्य नाही. त्यांच्या मते जे पार्वणपिंड अर्पण करतात, अशा मातेकडील नातेवाईकांपूर्वी त्याच श्रेणीतील पित्याशी संबद्ध असलेल्या नातेवाईकांना प्राधान्य द्यायला हवे. आणि पित्याकडील नातेवाईकांचा अभावच असताना मात्र त्याच

श्रेणीतील मातेशी संबद्ध असलेल्या नातेवाईकांचा क्रम लागतो. अशा वेळी मातेकडील या नातेवाईकांपूर्वी पित्याशी संबद्ध असलेल्या दूरच्या नातेवाईकांना वारसाक्रमात प्राधान्य देणे योग्य नाही.

अशा रीतीने आपण पाहिले की, सामाजिक परिस्थितीचा परिणाम म्हणून मातेकडील नातेवाईकांना वारसांच्या क्रमात प्राधान्य देताना जीमूतवाहनांनी विज्ञानेश्वरांपेक्षा वेगळा असा वारसांचा क्रम सांगितला आहे. वारसाहक्काचे बाबतीत बंगालमधील कायदा सर्व भारतात चालणाऱ्या कायद्यापेक्षा वेगळा कां आहे याची कारणमीमांसा न्यायाधीश श्री. शरच्चंद्र मित्रा यांनी दिलेली आहे –

Law Quarterly Review मध्ये हिंदू कायद्याच्या Bengal School च्या उत्पत्ती आणि विकास याबद्दल ते सांगतात, ''भारताचा अतिपूर्वेकडील भाग – ज्यात बंगालचा समावेश होतो, त्याला समुद्रकिनाऱ्याचे सान्निध्य आहे. या भागाशी अनेक देशांचा व्यापार समुद्रमार्गे चालतो. त्याचबरोबर रोजच्या नवीन कल्पनांचा, गोष्टींचा आगम या भागात होतो. या भागात बौद्ध धर्म फार मोठ्या प्रमाणावर प्रस्थापित झाला होता. या धर्माचा तेथील स्त्रियांच्या सामाजिक स्थितीवर, दर्जावर सखोल परिणाम झाला होता. तसेच 'महानिर्वाण' यासारख्या तंत्रांनी सृष्टीतील स्त्रीच्या अंशाच्या उच्च – महत्त्वाच्या स्थानाला मान्यता दिलेली होती. संपत्तीबाबतचा स्त्रीविषयक जो कायदा, त्यावरही या गोष्टींचा परिणाम झाला. संपत्तीवरील स्त्रीचे अधिकार, संपत्तीचा व्यय करण्याचे बाबतीत तिला असलेले हक्क या बाबतीत बऱ्याच अंशी प्रभाव पडला. याबद्दल झालेल्या कायद्याचा जीमूतवाहनांनी दायभागात अंतर्भाव केला आहे.

सारांश, बऱ्याच अंशी हिंदू कायदा आणि बंगालमधील कायदा यात सारखेपणा आहे. पण काही मुद्द्यांचे बाबतीत इतका फरक आहे की, त्यामुळे 'बंगालमधील कायदा' आणि 'हिंदू कायदा' अशी भिन्नता निर्माण होऊन देशातील निरनिराळ्या भागांमध्ये तो कायदा प्रचलित झाला. याचे कारण म्हणून 'सामाजिक परिस्थितीचा परिणाम' याचाच निर्देश आपल्याला करता येईल.

**।। ॐ स्वस्ति ।।**

❀ ❀ ❀

## References


1. Ayangar, Krishnaswami : The Hindu Law
2. Banerji, A. C. : Studies in the Brahmans
3. Banerji, Suresh Chandra (Prof.) : Dharma Sutras
4. Banerji, Sir Guroodas : Marriage and Stridhana
5. Bhattacharya, Ramshankar (Edited & Translated) : Garud-Puran of M. V. Vyas
6. Bukler, Dr. (Introduction) : The Laws of Manu
7. Buller : Sacred Books of the East
8. Chakravarty, C. : Cultural History of the Hindus
9. Colebrooke (Translation) : Daya-Vibhaga
10. Colebrooke : Mitakshara
11. Desai, Sunderlal : Principles of Hindu Law
12. Dutta, M. N. : Dharma Shastra
13. Fuhrer, A. A. (Edited) : Vasistha Dharmashastram
14. Gold Stucker, T. : Sanskrit and Culture
15. Gour, H. S. : Hindu Code
16. Ghose, B. K. : Hindu Law and Customs
17. Ghose, Balkrishna (Edited) : Vyasa-Smriti (Vyavahara Chapter)
18. Gupte, S. V. : Hindu Law of Succession
19. Hazra, Prof. : Our Heritage-Vol.VII Pt. I
20. Hazra, Prof. : The Studies in the Puranik Records on Hindu Rites and Customs
21. Hastings, James (Edited) : Encyclopaedia of Religion and Ethics
22. Indra, Prof. : Status of Women in Ancient India
23. Iyengar, S. Shrinivasa : Mayne's Treaties on Hindu

Law and Customs

24. Jolly, Dr. : Tagore Law Lectures
25. Kane, P. V. : Hindu Customs and Modern Law
26. Kane, P. V. : History of Dharmashastra - Vol. I
27. Kane, P. V. : History of Dharmashastra - Vol. II; Pt. I & 2
28. Kane, P. V. : History of Dharmashastra - Vol. III
29. Kane, P. V. : History of Dharmashastra - Vol. IV
30. Kane, P. V. : History of Dharmashastra - Vol. V
31. Kane, P. V. (Introduction, Notes & Translation) : कात्यायनस्मृतिसारोद्धार OR Katyayansmriti on Vyavahara
32. Kane, P. V. : Notes on Vyavaharamayukh
33. Kane, P. V. : Vyavaharamayukh
34. Kumarila : Tantravartika (being a gloss on Shabarsami's commentary on the Mimamsa Sutras) Benaras Sanskrit Series, 1903.
35. Lowie, R. H. : Primitive Society
36. Macnagthan, W. H. : Hindu Law
37. Mandlik, V. N. : Hindu Law
38. Malinowaski : Crime and Custom in Savage Society
39. Mayne, J. D. & Coutts, V. : Treaties on Hindu Law

| | | | |
|---|---|---|---|
| 40. | Mayne, Sir Henry S. | : | Dissertation on Early Law and Custom |
| 41. | Mayne, Sir Henry S. | : | The Early History of Institutions |
| 42. | Mitra, Trilokyanath | : | The Law Relating to the Hindu Widow |
| 43. | Mulla, D. F. | : | Principles of Hindu Law |
| 44. | Pathak, Shridharshastri | : | Lectures on Dharmashastra |
| 45. | Pawate, I. S. | : | Daya-Vibhaga |
| 46. | Ramgopal | : | India of Vedic Kalpa Sutras |
| 47. | Ramkrishana, C. S. | : | Hindu Law |
| 48. | Roy, Pratap Chandra (Translation) | : | Mahabharat of Krishna Dwaipayana Vyas - Anusasana Parva Pt. I. |
| 49. | Roy, Pratap Chandra (Translation) | : | Mahabharata of Krishna Dwaipayana Vyasa - Udyoga Parva, Vol. V. |
| 50. | Sarkar, B. K. | : | Creative India |
| 51. | Sarkar, K. L. | : | Rules of Interpretation in Hindu Law |
| 52. | Sarkar, U. C. | : | Epochs in Hindu Legal History |
| 53. | Sarvadhikari, Rajkumar | : | The Principles of Hindu Law of Inheritance |
| 54. | Shamashaatry, C. R. (Edited) | : | Arthashastra - Kautilya |
| 55. | Shastri, G. P. (Translated) | : | Kautilya - Arthashastra |
| 56. | Shastri, G. S. | : | A Treaties on Hindu Law |
| 57. | Tripathi, R. S. | : | History of Ancient India |
| 58. | Venkataraman, S. | : | A Treaties on Hindu Law |

59. West and Buhler : Digest of Hindu Law

60. Wilson, H. H. : The Vishnu-Purana - A System of Hindu Mythology and Tradition

## संदर्भ ग्रंथ

१. अय्यंगार, रंगास्वामी, अय्यंगार, कृष्णा (संपादित) : व्यवहार निर्णय – वरदराज

२. आपस्तम्ब : आपस्तम्ब धर्मसूत्र

३. काणे, पी. व्ही. : धर्मशास्त्र विचार

३. कात्यायन : कात्यायन स्मृति

४. कोलांगडे, रा. गो. : योगीश्वर याज्ञवल्क्य

५. कृष्णम्माचारी, पंडित व्ही. (संपादित) : विष्णु–स्मृति–केशववैजयंती संहिता

६. गुप्त, (भाषांतरित) : विष्णु–पुराण – व्यास

७. गुरूमंडल प्रकाशन १९५२ : स्मृति–संदर्भ (भाग १–६)

८. गोखले, शंकरशास्त्री : व्यवहारदर्पण

९. गौतम : गौतम धर्मसूत्राणि

१०. जीमूतवाहन, श्री. म. म. श्रीकृष्ण तर्कालंकारकृत व्याख्यायानुगत : दायभाग

११. जोशी, लक्ष्मणशास्त्री (संपादित) : धर्मकोष, खंड १ ला

१२. झा, गंगानाथ : मनुस्मृति

१३. झा. हरिहर : व्यवहार विज्ञानम् – भाग १–२

१४. देवान भट्ट : स्मृतिचंद्रिका

१५. नीलकंठ भट्ट : व्यवहारमयूरव

१६. पाणिनि : कौमुदी

१७. पाण्डेय, उमेशचंद्र (व्याख्याकार) : याज्ञवल्क्य–स्मृति मिताक्षरा संस्कृत टीकासहित

| | | |
|---|---|---|
| १८. बालम्भट्टी (व्याख्यासमलंकृत) | : | याज्ञवल्क्य-स्मृति |
| १९. ब्रह्मदत (संपादित) | : | यजुर्वेद -भाष्य |
| २०. बॅनर्जी, के. एम. (संपादित) | : | मार्कंडेय पुराण - व्यास |
| २१. भानु, चिंतामण गंगाधर (संपादित) | : | छांदोग्योपनिषद् - शांकरभाष्यसहित, प्रकरण १-६ |
| २२. मारूळकर, एस्. आर्. (संपादित) | : | दत्तकचंद्रिका |
| २३. मिरजकर, कै. मु. ग. (भाषांतरित) | : | मनुस्मृति |
| २४. मिताक्षरा संस्कृत टीकासहित | : | याज्ञवल्क्य-स्मृति |
| २५. मित्रमिश्र | : | वीरा मित्रोदय |
| २६. मित्रमिश्र | : | व्यवहार-प्रकाश |
| २७. मिश्र, वाचस्पति | : | विवाद चिंतामणि |
| २८. मिश्र, वाचस्पति | : | व्यवहार चिंतामणि |
| २९. रघुनंदन | : | स्मृतितत्त्व |
| ३०. राशीवलेकर आणि बापट | : | भविष्य पुराण |
| ३१. सत्यकेतू, विद्यालंकार | : | भारतीय संस्कृति और उसका इतिहास |
| ३२. सायणाचार्य | : | ऐतरेय ब्राह्मणम् |
| ३३. सायणाचार्य | : | ताण्डयमहाब्राह्मणम् |
| ३४. सायणाचार्य | : | शतपथब्राह्मणम् |
| ३५. सोनटक्के, ना. श्री. आणि त्रि. ना. धर्माधिकारी | : | कृष्णयजुर्वेदिया तैत्तिरीय-संहिता (भट्ट भास्कर सायणाचार्य विरचित भाष्यसमेता) |
| ३६. हरसुले, पां. द. | : | हिंदू वारसा कायदा |
| ३७. दायतत्त्वम् | : | श्रीरघुनंदनभट्टाचार्य विरचित स्मृतितत्त्वापर नामाष्टाविंशति-तत्त्वान्तर्गतम्, श्री गोलपचंद्र-शास्त्रिणा संशोधितम् |


